


**जन्मशताब्दी**

२००४ - २००५ स्मृती सौरभ १०

# सर्वांसाठी गीता

## एक जीवनग्रंथ

भाग - १

प्रा. द. ना. दुभाषी

॥ वंदे श्री सिद्धराम - काडसिद्धेश्वराभ्याम् ॥

# सर्वांसाठी गीता : एक जीवनग्रंथ

## भाग - १ (अध्याय १ ते ४)

**प्रा. द. ना. दुभाषी**


मुद्रण :
देविका आर्ट प्रिंटर्स

मुखपृष्ठ :
कुणाल रेगे

मजकूर तपासणी :
श्री. ज्ञानेश्वर भालेकर

अक्षर जुळवणी :
ओंकार कॉम्प्युटर्स,
डोंबिवली

आवृत्ती पहिली :
जानेवारी - २००५

मूल्य :

प्रकाशक :






सिद्धगिरी गुरुकुल फाऊन्डेशन
कणेरी, कोल्हापूर

# प्रस्तावना

भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाचे निमित्त करून जगाला सांगितलेली व भगवान व्यासांनी श्लोकबद्ध केलेली श्रीमद्भगवद्गीता हे जगातील आश्चर्यांपैकी एक आश्चर्य आहे. प्रा. द. ना. दुभाषी यांनी सहृदय अन्तःकरणाने ते आश्चर्य सर्वांनाच आपले वाटेल व दुरावा नाहीसा होईल अशा रीतीने त्यावर भाष्य केले आहे. प्रा. दुभाषी यांनी लेखमालेच्या स्वरूपात लिहिलेले हे भाष्य अनेकांना खूप आवडल्यामुळे ते त्यात आवश्यक ती भर घालून ग्रंथस्वरूपात प्रसिद्ध होत आहे. जनताजनार्दनाने दिलेली पोच सर्वांत मोलाची असते.

शरद ऋतूतील पूर्णचंद्राकडे जसे सर्व रसिक आकृष्ट होतात त्याप्रमाणे गीतेकडे सर्व सात्त्विक विचारवन्त आकर्षित होतात. दैनंदिन मानवी जीवनातील समस्यांचे भान ठेवून त्यांची व्यवहार, धर्म, नीती व अध्यात्म या चारही स्तरांवरील सोडवण या अद्भुत ग्रंथामध्ये आहे. युद्धातून बाहेर जाण्याचा अर्जुनाचा मोह १) व्यावहारिक दृष्टीने अकीर्तिकर आहे. २) 'मारला गेलास तर स्वर्ग लाभेल' हा धर्मशास्त्राचा निर्णय आहे. ३) युद्धनीतीच्या क्षात्रवृत्तीला ते शोभणारे नाही. ४) 'योगस्थ राहून संग सोडून कर्म कर' हा आध्यात्मिक उपदेश आहे. लेखकाने चारही स्तरांना चांगला न्याय दिला आहे.

गीतेची महाभारताची पार्श्वभूमी लक्षात घेऊन लेखकाने कामक्रोधादिकांचे प्रतिनिधी असलेले कौरव आणि दैवीसंपदेचे प्रतिनिधी असलेले पांडव यांच्या संघर्षाचे चित्र उभे केले आहे. 'जीवन हे कुरुक्षेत्र असून त्याचे धर्मक्षेत्र करण्यात पुरुषार्थ आहे,' हे वाक्य अंतःकरणाला भिडणारे आहे.

भगवान श्रीकृष्ण व त्याचा परमस्नेहीभक्त अर्जुन यांचे अवीट गोड चरित्र प्रारंभी सांगून औचित्य साधले आहे. सत्त्वगुण जेव्हा व्यक्तीचे 'हृदय ढिले' करतो व धर्म-अधर्माच्या संभ्रमाचे विष जेव्हा त्याच्या अंतःकरणात भिनते तेव्हा अर्जुनासारख्या 'नरशार्दूला'शी युद्ध करण्याची हिंमत दुर्योधनासारख्या 'कोल्ह्याला'ही होते. महान पराक्रमाला विवेकाची जोड नसेल तर तोही व्यर्थ ठरण्याची शक्यता असते. अविवेकाला पराक्रमाची साथ असेल तर त्याचाही विजय होण्याचा धोका असतो. उदा. दुर्योधनाचा पक्ष कितीही अन्यायाचा असला तरी त्याला भीष्म, द्रोण व कर्णासारख्या अतिमानुष योद्ध्यांची साथ होती. एकूण ईश्वराच्या राज्यात अन्यायाला पराक्रमाची साथ मिळू शकते! म्हणून न्यायाच्या पक्षानेही प्रचंड सामर्थ्य कमाविले पाहिजे. देवावर भार घालून भागत नाही.

गीतेच्या स्वरूपाची खरी ओळख प्रत्येक अध्यायाच्या शेवटी येणाऱ्या समाप्तीमध्ये आहे. 'श्रीमत् भगवत्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन संवादे' असे समाप्तीचे शब्द आहेत. गीतेला शास्त्रामध्ये स्मृती म्हटले आहे. कारण भगवान श्रीकृष्णाने रणांगणावर केलेल्या उपदेशाला भगवान व्यासांनी छंदबद्ध केले आहे. असे असले तरी गीतेला उपनिषदांचे मूल्य आहे. उपनिषदांप्रमाणेच ब्रह्मविद्या हा गीतेचा प्रमुख विषय आहे. ब्रह्मविद्येच्या अनुभवासाठी कर्म, भक्ती, ध्यान व ज्ञान अशा चारही योगांच्या शास्त्रांच्या अभ्यासाची जरूर आहे. क्षराक्षर विभाग, गुणत्तम विभाग इत्यादी योग पूरक आहेत.

हा संवाद कोणा सामान्य व्यक्तींमधील नसून जगद्गुरू भगवान श्रीकृष्ण व अधिकारसंपन्न शिष्य अर्जुन यांच्यातील असल्याने तो संवाद परम श्रद्धेय आहे, हा विचार लेखकाने जागोजागी मांडला आहे.

'जीवो जीवस्य जीवनम्' या गीतेतील सिद्धान्ताचा दोन प्रकारे अर्थ करता येतो. जगण्यासाठी एक जीव दुसऱ्या जीवाला खातो हा पहिला अर्थ असून एक जीव जीवनासाठी दुसऱ्यावर अवलंबून असतो, हा दुसरा अर्थ आहे. कोणताही अर्थ स्वीकारला तरी जीवन संघर्षमय असते हे त्याचे तात्पर्य आहे. ही ईश्वरी व्यवस्था असल्याने अनिवार्य आहे. या संघर्षमय जगात एका व्यक्तीने ज्या तत्त्वज्ञानाच्या आधाराने जगून आपले ऐहिक व पारलौकिक कल्याण साधावे ते तत्त्वज्ञान गीतेत मांडले आहे. प्रारब्ध प्रतिकूल असेल तर सृष्टीच्या झंझावातात (उदा. महायुद्धे, दंगे इ.) किंवा निसर्गाच्या तडाख्यात (उदा. धरणीकंप, वादळे इ.) जीव सापडतो व कदाचित कोणत्याच कल्याणाची संधी न मिळता त्याचे जीवन संपते. पण त्याने त्या दिशेने जे थोडेफार प्रयत्न केले असतील त्यांचे फळ म्हणून त्याला पुढील जन्मात अनुकूलता मिळते. या आश्वासनावर निर्भर राहून व्यक्तीने निष्काम कर्म, निष्काम उपासना, ध्यान व ज्ञान यांची कास धरून आपले जीवन उत्साहाने व आनंदाने जगावे.

ग्रंथाचे परीक्षण किंवा रसग्रहण करणे हा प्रस्तावनेचा हेतू नाही. लेखकाने आरंभलेल्या यज्ञात एक समिधा अर्पावी एवढ्या माफक हेतूने चार शब्द लिहिले आहेत. या यज्ञाचा प्रसाद वाचक व साधकांनी भरभरून ग्रहण करावा, ही भगवान श्रीकृष्ण चरणी प्रार्थना.

**– डॉ. श्रीकृष्ण देशमुख**
मुरगूड, कोल्हापूर

# लेखकाचे मनोगत

श्रीमदभगवद्‌गीता हा केवळ तत्त्वज्ञानाचा, पारायणाचा व पूजेचा ग्रंथ नसून, तो आपल्या लौकिक, व्यावहारिक जीवनाच्या सर्व क्षेत्रांत मार्गदर्शक ठरणारा वैश्विक ग्रंथ आहे. असा हा ऐहिक व पारलौकिक कल्याण करणारा ग्रंथ सर्वांना सहज समजेल अशा सोप्या, सुबोध भाषेतून सांगण्यासाठी, कोल्हापूर येथील 'गीतामंदिर पत्रिके'तून लेखमाला सुरू केली. यामध्ये जून १९९६ पासून डिसेंबर २००१ पर्यंत एकूण ६२ लेख प्रसिद्ध झाले. या पत्रिकेत पानांची मर्यादा असल्यामुळे सुरुवातीस लेखनमर्यादाही आली. त्यामुळे पुनर्लेखन करून याचा थोडा अधिक विस्तार केला. व आज हे पुस्तकरूपाने चार खंडांत प्रसिद्ध होत आहे. गीतेच्या विचारांचा म्हणजे प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्णाच्या विचारांचा प्रचार व प्रसार करणे म्हणजे भगवंताला आवडणारी खरी भक्ती (अ.१८ श्लोक ६८) असे समजूनच हा प्रयास केला आहे.

प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामी महाराज यांच्या प्रेरणेने व कृपाशीर्वादाने हा संकल्प पूर्ण होत आहे. ब्रह्मलीन जगद्‌गुरू श्री काडसिद्धेश्वर महाराज यांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने प. पू. अदृश्य स्वामीजींनी या शताब्दी वर्षात १०० मौलिक पुस्तके प्रसिद्ध करण्याचा शुभ संकल्प सोडला आहे. त्यांच्या या अपूर्व ज्ञानयज्ञात सहभागी होण्याचे परमभाग्य मला लाभले, हे मी माझे पूर्वसुकृत समजतो. गीतेतील संन्यासी हा कर्मयोगी कसा असावा याचा आदर्श, म्हणजे प. पू. अदृश्य स्वामीजी होत. अंतःकरणातून शांत, संन्यस्त व बाहेरून सतत कर्मशील असणारे व जनसामान्यांसाठी कामाचा डोंगर उभा करणारे हे अनासक्त कर्मयोगी आहेत. अत्याधुनिक, सुसज्ज सिद्धगिरी हॉस्पिटल व रिसर्च सेंटर, १०० योगग्रामांची निर्मिती करण्यासाठी, स्त्री-पुरुष योगशिक्षकांना प्रशिक्षित करण्याची योजना, शेतीसाठी व पाणीपुरवठ्यासाठी केलेल्या योजना व त्यात हा ज्ञानयज्ञ... स्वामीजींचे हे सर्व शुभसंकल्प, ईशकृपेने पूर्ण होतील हे निःसंशय!

या ज्ञानयज्ञात पुस्तकरूपाने वाहिलेली ही माझी अल्पशी समिधा आहे.

गीता प्रेस, गोरखपूरचे संस्थापक महान भगवद्‌भक्त कै. जयदयाल गोयनका यांचे नातू श्री. माधवप्रसाद गोयनका हे या गीतापत्रिकेचे संस्थापक-संपादक आहेत. त्यांचा गीतेचा अभ्यास व व्यासंग सखोल आहे. श्री. गोयनका यांचे प्रोत्साहन व सहकार्य यामुळे हे लेखन पार पडले, याबद्दल कृतज्ञतापूर्वक मी त्यांचे आभार मानतो. श्री. मुळजीभाई शहा व इतर विश्वस्त यांचाही मी सदैव ऋणी आहे. या पाच वर्षांच्या लेखनकाळात, असंख्य वाचकांनी, पत्ररूपाने पाठविलेल्या बोलक्या प्रतिक्रिया व प्रतिसाद यामुळे उत्साह व बळ लाभले, याबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करतो.

श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ व प्रसिद्ध प्रवचनकार डॉ. श्रीकृष्ण देशमुख यांची प्रस्तावना या पुस्तकास लाभली आहे. अध्यात्मक्षेत्रात त्यांनी केलेले उत्तुंग कार्य, हे माझ्यासारख्या साधकांना सदैव मार्गदर्शनपर ठरले आहे. त्यांनी तत्परतेने लिहिलेल्या प्रस्तावनेबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

गीतेवर भाष्य करण्याचा माझा अधिकार नाही. गीता जशी मला समजली व त्यामुळे माझ्या जीवनात जो मला प्रसाद लाभला, तसा तो सर्वांना मिळावा या हेतूने भक्तिपूर्वक केलेले हे लिखाण आहे. हे अधिकाधिक वाचकांपर्यंत पोहोचावे ही इच्छा केवळ प. पू. अदृश्य स्वामीजींच्या आज्ञेने व आशीर्वादाने पूर्ण होत आहे याबद्दल मी पुन्हा एकदा मनापासून आभार मानून हे मनोगत पूर्ण करतो.

**– प्रा. द. ना. दुभाषी**
नागाळा पार्क, कोल्हापूर.

।। श्री कृष्णार्पणमस्तु ।।

# ।। ग्रंथदान ।।

सद्‌गुरू काडसिद्धेश्वर महाराजांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्ताने होणाऱ्या १०० पुस्तकांपैकी 'सर्वांसाठी गीता - एक जीवनग्रंथ' (भाग पहिला) या पुस्तकाच्या प्रकाशनाचा मान श्री. विवेक मोरे यांना मिळत आहे. हे पुस्तक ते आपल्या वडिलांच्या म्हणजेच कै. डॉ. प्रभाकर मोरे यांच्या स्मरणार्थ प्रकाशित करीत आहेत.

सुमारे १९४० च्या दरम्यान श्री. विवेक मोरे यांचे आजोबा कै. यशवंत मोरे व त्यांच्या पत्नी रेणूबाई या उभयतांनी, महाराजांचे गिरगांव येथे कार्यक्रम होत असताना अनुग्रह घेतला. त्यानंतर काही वर्षांच्या अवधीत यशवंतरावांचे निधन झाले. त्यांच्या पश्चात वेणूबाईंनी कुटुंबाची समर्थपणे धुरा सांभाळून सर्व कुटुंबालाच सत्संगाचा, अध्यात्माचा निधिध्यास लावला. प्रत्येक सप्ताह येन-केन रीत्या करणे, भजन, प्रवचन, आरती नित्यनेमाने करणे इत्यादी उपक्रमांतून त्यांनी कुटुंबाला गुरुसेवेची गोडी लावली. याचा ठसा आपल्याला श्री. मोरे यांच्या चौथ्या पिढीपर्यंत उमटलेला दिसतो. तेव्हापासून आजपर्यंतच्या त्यांच्या सर्व पिढ्या सद्‌गुरु काडसिद्धेश्वर महाराज व प.पू. अदृश्य काडसिद्धेश्वर महाराज या आपल्या आराध्य दैवतांच्या ठिकाणी लीन आहेत. श्री. विवेक मोरे हे मठाच्या विकासाच्या कामात उत्साहाने सहभागी होत असतात. मठात येणाऱ्या भक्तगणांना वैद्यकीय सेवा उपलब्ध करून देण्यामागे त्यांचा मोलाचा वाटा आहे. अशा प्रकारे तन-मन-धन गुरुसेवेत लावून ते आपले कर्तव्य चोख बजावत आहेत, ते या एका सुभाषितात म्हटल्याप्रमाणे

*विषन्ति नद्यः स्वयेमव नाम्भः ।*
*स्वयं न खादन्ति फलानि वृक्षाः ।।*
*नादन्ति सस्यं खलु वारिवाहाः ।*
*परोपकाराय संता विभूतयः ।।*

अर्थ : नद्या आपले पाणी स्वतःच पीत नाहीत. वृक्षही आपली फळे आपणच खात नाहीत. मेघ (त्यांच्या पाण्यामुळे वाढलेले) धान्य स्वतः भक्षण करीत नाहीत. (तसेच) सज्जनांचे वैभव परोपकार करण्यासाठीच असते.

त्यांची व त्यांच्या कुटुंबीयांची धर्मकार्य, गुरुसेवा, सत्संग करण्याची वृत्ती दिवसेंदिवस वृद्धिंगत होवो; हे कुटुंब सदैव आनंदी राहो; त्यांना भरपूर धनधान्य, आयुरारोग्य, आत्मशांती लाभा। ही ईश्वरचरणी प्रार्थना!

**श्री. मोरे कुटुंबीयांचा वंशावळ नकाशा पुढीलप्रमाणे**



# अनुक्रमणिका



# गीता-माहात्म्य

**''तैसा वाग्विलास विस्तारूं ।**
**गीतार्थेसी विश्व भरूं ।**
**आनंदाचे आवारूं ।**
**मांडू जगा ।।''** अ.१३. ११५९।।

ज्ञानराज माऊली १३ व्या अध्यायात गीतेची थोरवी मुक्तकंठाने गातात. ''याप्रमाणे वाणीच्या विलासाचा विस्तार करू व गीतार्थाने विश्व भरून टाकू व सगळ्या जगाला आनंदाचा कोट करू.'' ''दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा...'' असा विश्वकल्याणाचा विचार व्यक्त करतात. 'हे विश्वचि माझे घर' असे म्हणणाऱ्या ज्ञानेश्वरांचा गीतेच्या सामर्थ्यावर किती सार्थ विश्वास होता हे या सर्व ओव्यांतून प्रकट होते. गीतेकडे ते विश्वमाऊली म्हणून पाहतात. गीता हे जीवनाचे शास्त्र असून संपूर्ण मानव जातीसाठीच ते आहे - हा जीवनग्रंथ जागतिक ग्रंथ आहे अशीच त्यांची श्रद्धा होती. ज्ञानेश्वरांना 'गीता' हा वेदांपेक्षा श्रेष्ठ आहे असे वाटले. कारण अपौरुषेय वेद म्हणजेच देवांचे झोपेतले घोरणे आहे. तर गीता म्हणजे भगवंताने आपल्या मुखाने सांगितलेला ग्रंथ आहे म्हणून पहिल्या अध्यायात माऊली म्हणते,

**''हा वेदार्थसागरू । जया निद्रिताचा घोरू।**
**तो स्वये सर्वेश्वरू । प्रत्यक्ष अनुवादला''** ।।७१।।

गीतेचे औदार्य वेगळे आहे. वेद अध्यात्मज्ञानाच्या बाबतीत फार कंजुष, कृपण आहेत, कारण तो केवळ ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तीन वर्णांशीच संवाद साधतो, पण हा उणेपणा गीतेने दूर केला आहे. सर्व वर्णांच्याच नव्हे तर सर्व स्त्री-शूद्रादी मानवजातीच्या मुक्तीचा, कल्याणाचा विचार गीतेने केला आहे. म्हणून माऊली म्हणते, ''वेदु संपन्नु होय ठाईं । परी कृपणु ऐसे आनु नाहीं...

हे भगवद्‌गीतेचे सामर्थ्य जाणून सर्वसामान्यांना गीता समजावी म्हणून ज्ञानेश्वरांनी 'भावार्थदीपिका' लिहिली. गीतेच्या ७०० श्लोकांचे ९००० ओव्यांमध्ये रूपांतर करून भगवंताचे मनोगत विशद करून सांगितले.

निर्विवाद श्रेष्ठत्व सिद्ध झालेल्या अशा अमूल्य ग्रंथाचे माहात्म्य कथन करण्याचाच ह्या लेखाचा हेतू. गीतेचे तत्त्वज्ञान सांगण्याचा नव्हे. हिमालयाच्या

उत्तुंग शिखराकडे पाहिल्यानंतर अभावितपणे जसे उद्‌गार निघतात किंवा सागराच्या विशालतेकडे आणि आकाशाच्या अमर्याद भव्यतेकडे नजर टाकल्यानंतर जो भाव निर्माण होतो तसाच गीता-माऊलीकडे पाहून होतो. गीता जगत्‌जननी आहे. सर्व विश्वात तिचा बोलबाला आहे. जगाच्या असंख्य भाषांतून गीतेची भाषांतरे झाली आहेत. अनेक जागतिक कीर्तीच्या विद्वानांनी गीतेवर भाष्ये लिहिली आहेत. केवळ भारतीयांनीच नव्हे तर परदेशी पंडितांनीही गीतेची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. कार्लाइल, इमर्सन, थोरो, डॉ. टॉयनबी असे थोर तत्त्वज्ञ, समाजशास्त्रज्ञ गीतेच्या विचारांनी केवळ प्रभावित झाले नव्हते तर गीतेचे विचार त्यांनी प्रत्यक्ष आचरणात आणले होते. अमेरिकेचा थोर तत्त्वज्ञानी थोरो यांना त्यांच्या उदात्त विचारांविषयी विचारण्यात आले. तेव्हा ते म्हणाले, ''रोज पहाटे उठल्यावर मी गीता वाचतो.'' "History of Mankind for Five Thousand Years" या पुस्तकाचे लेखक डॉ. टॉयनबी यांना असे विचारण्यात आले की, ''एकच पुस्तक जवळ ठेवायचे बंधन घातल्यास कोणते पुस्तक तुम्ही जवळ बाळगाल?'' त्या वेळी निःसंदिग्ध शब्दांत त्यांनी उत्तर दिले, ''जगातला महान ग्रंथ गीता हा मी स्वीकारीन.''

भारतीयांचा प्राणप्रिय असलेला हा ग्रंथ आज अनेकांनी केवळ पूजापाठासाठीच देव्हाऱ्यात ठेवला आहे. गीता पूज्य व पवित्र आहे, पण ती केवळ फुले वाहून नमस्कार करण्यासाठी नाही. भारतीयांचा धर्मग्रंथ म्हणून गीता सर्वश्रेष्ठ आहे पण ती किती जणांच्या मुखात आहे? गीतेचे जीवनविषयक सिद्धांत समजून आचरणात आणण्याचा किती प्रयत्न आपण करतो? श्रद्धेने तरी पाहिलेच पाहिजे. पण बुद्धीने समजून घेऊन एकाग्र चित्ताने गीतेचे अध्ययन कितपत होते? याबाबतीत ख्रिश्चनांची एक बाब निश्चित अनुकरणीय आहे. त्यांचा धर्मग्रंथ जो बायबल त्याचे नियमित पाठांतर, दर रविवारी चर्चमध्ये जाणे हे प्रत्येक ख्रिश्चन आपले कर्तव्य समजतो. इंग्लंडमधल्या कोणत्याही खेड्यातील माणसाला विचारले तर तो बायबलमधील काही ओळी तरी अस्खलित म्हणून दाखवील. अशा हिंदू म्हणवून घेणाऱ्या किती लोकांना गीतेचे श्लोक-विचार सांगता येतील? धर्माविषयीचा अभिमान म्हणजे आपल्या धर्मग्रंथांच्या विचारांचे आचरण!

२१व्या शतकात घोडदौड चाललेल्या, विज्ञानाच्या प्रगतीने दिपून गेलेल्या, आधुनिक प्रगत म्हणवून घेणाऱ्या आजच्या माणसाला खरंच गीता आवश्यक आहे का? मानवी जीवनातील गुंतागुंतीच्या जटिल समस्यांचे निवारण करून त्याला सुख-शांती देण्याचे सामर्थ्य गीतेच्या विचारात आहे अशी श्रद्धा गीतेवर आहे का? गीता व प्रत्यक्ष दैनंदिन जीवन ह्याचा संबंध कितपत आहे, की केवळ गीतेची आरती करून तृप्त होण्यातच कृतकृत्यता आहे, अशा प्रश्नांचा विचार करून गीतेचे स्वरूप समजून घेणे, ह्यासाठी हा लेखप्रपंच!



हा अपूर्व ग्रंथ ५००० वर्षांपूर्वी निर्माण झाला. 'गीता' शब्दाचा अर्थ गायिली गेलेली. भगवान श्रीकृष्णांनी ज्या मानवी धर्माचा उपदेश केला व जी धर्मतत्त्वे गायिली तीच श्रीमद्भगवद्‌गीता! प्रत्यक्ष भगवंताच्या मुखारविंदातून ही प्रकट झाल्याकारणाने हिचे अपूर्व महत्त्व!! **''यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत। अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्** ।।अ.४.७।।'' ज्या वेळी अधर्म वाढतो त्या वेळी धर्मसंस्थापनेसाठी, रक्षणासाठी मी अवतार घेतो.

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।।८।।**

या अवतारकार्यात मी सज्जनांचे संरक्षण व दुर्जनांचा नाश करतो. हे भगवंताचे आश्वासन आहे. धर्मसंस्थापनेसाठी भगवान श्रीकृष्णांनी अवतार घेतला आणि जो धर्म स्वतः आचरण करून दाखविला त्याच धर्माचा उपदेश त्यांनी आपल्या प्रियोत्तम भक्ताला, अर्जुनाला सांगितला. जी धर्मतत्त्वे गीतेच्या १८ अध्यायांतून सांगितली, त्या प्रत्यक्ष भगवंताच्या आज्ञाच आहेत. गीतेच्या प्रत्येक अध्यायाचा शेवटचा संकल्प असा आहे -

**''इति श्रीमद्भगवद्‌गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां**
**योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे...''**

यामध्ये आलेल्या 'श्रीमद्भगवद्‌गीता, उपनिषद्, ब्रह्मविद्या, योगशास्त्र, श्रीकृष्णार्जुनसंवाद' या पाच शब्दांपैकी कोणतेही एक नाव किंवा प्रत्येक नाव या ग्रंथाला योग्य, समर्पक होईल.

गीता हे केवळ उपनिषद् नसून ते सर्व उपनिषदांचे सार आहे.

**''सर्वोपनिषदो गावो, दोग्धा गोपालनन्दनः ।**
**पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ।।**

संपूर्ण उपनिषद्‌रूपी जितक्या गायी आहेत, त्यांचे सारभूत असे हे दूध भगवान श्रीकृष्णाने काढले. अर्जुन नावाचा ज्ञानी वत्स या दुधाचे सेवन करीत आहे.

या उपनिषद् शब्दाचा अर्थ : उप = समीप, नि = निःसंदेह, सद् = पोचविणारे ज्ञान असा आहे. या गीतेत सांगितलेले ज्ञान मनुष्याला निःसंदेह ईश्वराच्या समीप जाऊन विराजमान होण्याला योग्य बनवू शकते, म्हणूनच गीतेचे नाव उपनिषद्!

गीतेचे तिसरे नाव ब्रह्मविद्या! ब्रह्म = आदिशक्ती, हे विश्वाच्या सर्जक चैतन्याचे नाव. ह्या महान शक्तीचे ज्ञान करून घेणे, ती शक्ती आपल्यामध्ये अनुभविणे व मानवी जीवनाची सार्थकता करणे हा या ब्रह्मविद्येचा उद्देश आहे.

या गीतेचे नाव 'योगशास्त्र'ही आहे. गीतेत मुख्य १८ योग सांगितले आहेत. योग शब्दाचा अर्थ जोडणे हा आहे. अर्जुनाने आपला संबंध विषादाशी (खेदाशी) जोडला म्हणून पहिल्या अध्यायाचे नाव विषादयोग! याप्रमाणे जर

कोणी मनुष्य आपला संबंध पुरुषोत्तमाशी (ईश्वराशी) जोडील, तर तो त्याचा पुरुषोत्तमयोग होईल. म्हणजेच मनुष्याला विषादांपासून मुक्त करून पुरुषोत्तमाशी संबंध जोडणे हेच गीतेचे प्रयोजन असे म्हणणे युक्त होईल. नराचा नारायण होण्यातच मनुष्य जन्माची सार्थकता, कृतकृत्यता आहे. मोहनिरास करून स्वकर्तव्याची, स्वधर्माची शिकवण देत पुरुषाला पुरुषोत्तम-नारायण बनविणे हेच गीतेचे ध्येय आहे.

या ग्रंथाचे पाचवे नाव 'श्रीकृष्णार्जुनसंवाद' असेही आहे. हा पूर्णपुरुष श्रीकृष्ण व लाडका भक्त अर्जुन ह्यांचा संवाद आहे. पूर्ण पुरुषापासून पूर्णत्वाकडे जाण्याचा मार्ग शोधणारा हा संवाद आहे. अर्जुन प्रश्न विचारतो व त्याची उत्तरे श्रीकृष्ण देतात. ह्या दोघांच्या संवादातून मानव जातीसाठी तत्त्वज्ञान उभे राहिले. ह्यात नाट्य आहे, काव्य आहे, माधुर्य, ओज, प्रसाद हे सारे गुण आहेत. त्यामुळे तत्त्वज्ञान क्लिष्ट, गांभीर्यपूर्ण न होता त्यात अमृतमय खुमारी आली आहे.

गीतेचे सर्वार्थाने आकलन होण्यासाठी तिची ऐतिहासिक, सांस्कृतिक पूर्वपीठिका समजून घेणे आवश्यक आहे. गीता हे उपनिषदांवरील भाष्यही आहे. उपनिषदे वा ज्ञानकांड हा वेदांचा एक भाग.

भगवद्गीतेच्या विचारांनी प्रभावित होऊन अनेक भारतीय संत-महात्म्यांनी आपल्या आचरणाने गीतेची थोरवी सिद्ध केली आहे. गीतेतल्या ७०० श्लोकांतून प्रत्येक महान व्यक्तीला निरनिराळा अर्थ गवसला. वेगवेगळ्या श्लोकांनी प्रभावित केले. किंबहुना जगद्गुरू भगवान श्रीकृष्णांना हाच अर्थ अभिप्रेत होता असे सोदाहरण मांडण्याचा प्रयत्न केला. जवळजवळ ४५० भाष्यकारांनी गीतेवर प्रभावी भाष्य केले आहे. गीता नित्यनूतन आहे. मानवाच्या अंतापर्यंत गीतेचे तत्त्वज्ञान सतत उजळत राहणार आहे. गीता दीपस्तंभासारखी मानवजातीला सतत प्रकाश देणार आहे. भगवान शंकराचार्यांना ज्ञानयोग हे गीतेचे तात्पर्य आहे असे जाणवले. तर लोकमान्य टिळकांना कर्मयोग हाच श्रेष्ठ वाटला. श्रीमत् शंकराचार्य आपल्या भाष्याच्या प्रस्तावनेत लिहितात, ''**तदिदं गीताशास्त्रं समस्तवेदार्थसारसंग्रहभूतं...। तस्यास्य गीताशास्त्रस्य संक्षेपतः प्रयोजनं परं निःश्रेयसं...।**'' (गीताभाष्यम्) हे गीताशास्त्र सर्व वेदार्थांचे सारसंग्रहभूत आहे... ज्या शास्त्राचा हेतू निःश्रेयस असा आहे हे त्यांचे मत होते. श्रीमधुसूदनसरस्वती, श्रीधरस्वामीदेखील गीताशास्त्र असे म्हणतात. 'भाष्यकाराते वाट पुसतु' म्हणत ज्ञानेश्वर महाराजदेखील शंकराचार्यांचेच संदर्भ मानतात. टिळकांनी कर्मयोग श्रेष्ठ वाटल्यामुळे गीतारहस्यामध्ये कर्माचा पुरस्कार प्रभावीपणे केला आहे. त्यांनी असे प्रतिपादन केले आहे की, संपूर्ण गीतेत कर्मयोगाचे म्हणजे कर्मे



केलीच पाहिजेत व ती मोक्षाच्या आड न येता उलट ती करीत असतानाच मोक्ष मिळतो. कर्मे करण्यापुरताच तुझा अधिकार असून त्याचे फळ मिळणे किंवा न मिळणे ही बाब तुझ्या हाती नाही. फलदाता परमेश्वर आहे असे समजून (२.४७) निष्काम भावनेने व ईश्वरार्पण बुद्धीने 'समबुद्धीचा' आश्रय करून सतत कर्म करीत राहा. ''योगः कर्मसु कौशलम्,'' ''समत्वं योग उच्यते'' असा टिळकांचा आग्रह आहे. ज्ञानेश्वर माऊलींनी भक्तीवर अधिक जोर दिला. माऊली नवव्या अध्यायात म्हणते,

**''पैं भक्ति एकी मी जाणें । तेथ साने थोर न म्हणे ।**
**आम्ही भावाचे पाहुणे । भलतेया ।।३९५।।**
**येर पत्र पुष्प फळ । तें भजावया मिस केवळ ।**
**वाचूनि आमुचा लाग निष्फळ । भक्तितत्त्व ।।३९६।।**

भक्तांच्या ठिकाणी असलेले शुद्ध भक्तितत्त्वच आपणास आवडते ह्या भगवंताच्या मनोगताचीच मांडणी ज्ञानेश्वरांनी गीतेवरील आपल्या भाष्यांत कथन केली आहे.

**''जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।**
**हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ।।अ.१०. ११८।।**

प्रत्येकाच्या हृदयात परमेश्वराचा वास आहे. आत्मौपम्यदृष्टीने सर्वांकडे पाहणे हाच भक्तियोग त्यांना गीतेत जाणवला.

अलीकडच्या काळात स्वामी विवेकानंदांनी गीतेच्या तत्त्वज्ञानाचा प्रचार पाश्चिमात्य देशांमध्ये हिरिरीने केला. स्वामीजींच्या जीवनस्रोताचा मुख्य भाग भगवद्गीतेचाच आहे. आपल्या शिष्यांना त्यांनी एकदा सांगितले, ''संपूर्ण गीता जरी अभ्यासता आली नाही, पाठ करणे जमली नाही तरी एकच श्लोक सतत डोळ्यासमोर ठेवा व त्याप्रमाणे आचरण करा.'' असे म्हणून स्वामी विवेकानंदांनी दुसऱ्या अध्यायातील तिसरा श्लोक शिष्यांना सांगितला.

**''क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ।।३।।**

दुबळेपणा-दौर्बल्य-बलहीनता हाच मृत्यू. हृदय-दौबल्य सोडून उठण्याबद्दलचा उपदेश त्यांनी सर्वांना केला. किंबहुना गीतेचे हेच सार आहे हे त्यांनी जीवनभर आचरण करून दाखविले.

महात्मा गांधींनी भगवद्गीतेचा अनुवाद गुजराथी भाषेत केला व त्याचे नाव त्यांनी 'अनासक्तियोग' असे ठेवले. अनासक्ती हाच गीतेचा मुख्य उपदेश आहे, असे महात्मा गांधींनी विशद केले. 'निष्कामकर्माने, यज्ञार्थ कर्म करून,

कर्मफलाचा त्याग करून कमलपत्राप्रमाणे जीवन जगणे हाच गीतेचा उपदेश मानून गांधीजी जीवन जगले. महात्मा गांधींप्रमाणे विनोबांनाही गीता माऊली वाटली. विनोबा म्हणतात की, गीतेचा व माझा संबंध तर्कापलीकडचा आहे. गीता म्हणजे माझे प्राणतत्त्व. माझे शरीर आईच्या दुधावर पोसले, त्यापेक्षाही माझे हृदय व बुद्धी यांचे गीतेच्या दुधावर अधिक पोषण झाले आहे. अशी विनोबाजींची गीतेवर श्रद्धा होती. नित्य पठनासाठी गीतेचा अनुवाद त्यांनी मराठीत केला. विनोबाजींचे संपूर्ण जीवन म्हणजे गीताविचारांचा आदर्श पाठच. किंबहुना ते प्रात्यक्षिकच होते.

आज संपूर्ण भारतात इतकेच नव्हे तर पाश्चात्त्य देशातही गीताविचारांचा, तत्त्वज्ञानाचा प्रचार-प्रसार करणाऱ्या असंख्य संस्था, संप्रदाय अलौकिक काम करत आहेत. संपूर्ण जगाला देण्यासारखे जर काही आपल्याकडे असेल तर ते फक्त गीतातत्त्वज्ञान. ज्याची या कराल युगात सर्वांनाच आवश्यकता आहे.

गीता जीवनग्रंथ मानून, स्वतःच्या जीवनात गीतेच्या तत्त्वज्ञानाला साकार रूप देऊन प.पू. पांडुरंगशास्त्री आठवले यांनी स्वाध्यायाच्या रूपाने भगवद्‌गीता लाखो लोकांच्या हृदयात पोचविली. गीतेच्या विचारांनी आदिवासी, कोळी, सामान्य शेतकरी अशा सर्वसामान्यांचे जीवन संपन्न केले. स्वाध्यायाचे सर्व प्रयोग गीतेच्या विचारावर आधारले आहेत. भक्ती ही सामाजिक शक्ती मानून पंचरंगी क्रांतीचा उद्‌घोष प.पू. दादांनी केला. आज जवळजवळ दोन लाख कृतिशील स्वाध्यायी हातात गीता घेऊन भारतातील खेड्या-खेड्यांत अहोरात्र काम करीत आहेत. गुजरातच्या हजारो खेड्यांतून गीतेच्या विचारांप्रमाणे आचरण करून लोकांनी रामराज्यच आणले आहे. गीतेच्या विचारांचा दुसरा पुरावा अधिक काय पाहिजे? जे गीता माझ्या भक्तांना समजावून देतात तेच सर्वांपेक्षा माझे लाडके असे जगद्‌गुरू कृष्णाने गीतेत १८व्या अध्यायात स्पष्ट सांगितले आहे. जीव, जगत् व जगदीश्वर ह्यांचा परस्पराशी काय संबंध आहे हे गीतेने स्पष्ट सांगितले आहे.

भगवंतांनी गीतेत मानवी जीवनातील सर्व महत्त्वाच्या विषयांना स्थान दिले आहे. मानवी जीवनाची इतिकर्तव्यता कशात आहे हे सर्व विशद करून सांगितले आहे. प्रत्येक श्लोक हा एक जीवनमंत्रच आहे. भक्तांना खूप आश्वासने दिली आहेत. 'न मे भक्तः प्रणश्यति' असे आश्वासक वचन दिले आहे. मी कुठे आहे, माझा पत्ता काय? भगवंताला कसे, कोठे शोधावे, त्याची भक्ती कशी करावी, भगवंताचे आवडते भक्त कोण, दैवी गुण कोणते, सुख-दुःख, आत्मा-परमात्मा, श्रद्धा-अश्रद्धा, ज्ञान, कर्म, भक्ती... हे सर्व समजावून दिले आहे. निःशंक करून सोडले आहे. संपूर्ण वेद-उपनिषदे ह्यांचे सार सूत्रबद्ध रीतीने समजावून दिले आहे.



हे सर्व गीतेत आहे. पण वाचतो कोण? मी कोण? माझा व जगाचा संबंध काय? आहार-निद्रा-भय-मैथुन ह्या पशुजीवनासारखेच माझे जीवन आहे की, ह्यापेक्षा वेगळे दैवी जीवन आहे? वास्तविक माणूस म्हणजे कृतज्ञता! ईश्वराने दिलेल्या प्रेमाची परतफेड करून 'करिष्ये वचनं तव' अशा अर्जुनाच्या वचनाप्रमाणे आपणदेखील अर्जुन होणार आहात का, हा खरा प्रश्न आहे. ईश्वराचे काम करणारा - कृतिभक्ती करणाराच मनुष्य अर्जुन होऊ शकतो. जो केवळ तत्त्वज्ञान वाचतच राहतो तो पंडित होऊ शकेल, पण गीता घेऊन जो माणसा-माणसापर्यंत जातो त्याचे नाव ऋषी अर्जुन! असा आवडता भक्त होण्यासाठी गीतेचे केवळ वाचन, पाठांतर न करता गीता समजून घेऊन, ती आचरणात आणून जीवन तेजस्वी करणे व प्रभूचा आवडता भक्त होणे, हेच मानवजीवनाचे सार-सर्वस्व!!

❋❋❋

# श्रीमद्‌भगवद्‌गीता व महाभारत

उपनिषदे, ब्रह्मसूत्रे व गीता ही वेदांताची प्रस्थानत्रयी! या त्रयीत गीता ही सर्वमान्य झाल्यामुळे या ग्रंथाला वैश्विक रूप प्राप्त झाले आहे. हा केवळ हिंदूंचा धर्मग्रंथ राहिला नसून तो अखिल मानवजातीचा ग्रंथ म्हणून गौरवपात्र झाला आहे.

गीतेच्या लोकप्रियतेचे दुसरे कारण म्हणजे, गीता महाभारताचा एक भाग आहे. महाभारताच्या भीष्मपर्वात ती ग्रथित असून अठरा अध्यायांतील ७०० श्लोकांमध्ये ती समाविष्ट झाली आहे. महाभारतातसुद्धा अठरा पर्वे आहेत व श्लोकसंख्या सुमारे एक लक्ष आहे. यातील भीष्मपर्वाचे अध्याय २३ ते ४० म्हणजे श्रीमद्‌भगवद्‌गीता होय. गीतेचे ७०० श्लोक चौघांच्या तोंडी आहेत. धृतराष्ट्र एक, संजयने ४१, अर्जुन ८४ व ५७४ श्लोक श्रीकृष्णाच्या मुखारविंदातून उद्‌धृत केले आहेत. महाभारताच्या अठरा पर्वांचा व गीतेच्या अठरा अध्यायांचा संख्येचा संबंध हा केवळ योगायोगाचा आहे. तसे पाहिले तर कौरव-पांडवांचे युद्ध अठरा दिवस चालले. त्यांच्या सैन्यांची संख्याही अठरा अक्षौहिणी होती. पुराणे व उपपुराणे यांची संख्याही अठरा आहे.

महाभारतामध्ये शांतिपर्वात अनेक प्रकरणांस गीता असे नाव दिलेले आहे. उदा. पराशरगीता, हंसगीता, पिंगलगीता, हारीतगीता इ., पण या गीता कृष्णाच्या मुखी नाहीत. या सर्व गीतांहून निराळी अशी गीता भगवान श्रीकृष्णाच्या मुखातून बाहेर पडली. साक्षात् भगवंताने गायिली असल्यामुळे तिला भगवद्‌गीता असे म्हणतात.

व्यासांच्या नावावर प्रसिद्ध असलेल्या महाभारताचे मूळ नाव 'जय' असे होते. त्यामध्ये फक्त ८८०० श्लोक होते. नंतर व्यासांच्या शिष्यपरंपरेतील वैशंपायन याने अर्जुनाचा पणतू राजा जनमेजय याने सर्पसत्र केले त्या वेळी व्यासांचा 'जय' हा ग्रंथ सांगितला. पण असे करताना त्याने अनेक कथांची भर घातल्याने एकूण श्लोकसंख्या २४००० झाली व 'जय' या ग्रंथाला 'भारत' हे नाव प्राप्त झाले. त्यानंतर कित्येक वर्षांनी नैमिषारण्यात शौनकाचा बारा वर्षे मुदतीचा यज्ञ चालू असताना सौती या सूतपुत्राने भारत ग्रंथाचे पठण केले. या वेळी शौनक व इतर ऋषी यांच्याशी झालेली प्रश्नोत्तरे त्याने 'भारतात' समाविष्ट केली. तसेच अनेक आख्याने, उपाख्याने यांची भर घातली. शिवाय हरिवंश हे परिशिष्टही जोडले. अशा प्रकारे या वाढलेल्या 'भारता'चे 'महाभारत' झाले. प्रचलित महाभारत सुमारे एक लक्ष श्लोकांचे आहे. व्यास, वैशंपायन व सौती या तिघांनी हा ग्रंथ निर्माण केला, असे आदिपर्वात म्हटले आहे.



महाभारत हा समस्त भारताचा राष्ट्रीय ग्रंथ आहे. भाषेची रसवत्ता आणि वर्णनाची भव्यता या दोन गुणांमुळे महाभारत हे महाकाव्य ठरले आहे. केवळ काल्पनिक किंवा अद्‌भुतरम्यता यापेक्षा तत्कालीन समाजाचे वास्तव चित्रण यात असल्यामुळे त्याला इतिहासाचे स्वरूप प्राप्त झाले आहे. म्हणून या ग्रंथाला "भारतं पंचमो वेदः" असे म्हटलेले आहे. याचा अर्थ त्याला पाचव्या वेदाचे स्थान व योग्यता प्राप्त झाली आहे. म्हणून महाभारत हा भारतीय संस्कृतीचा मूलस्तंभ आहे.

अशा या भव्य ग्रंथात अनेक राजांच्या व त्यांच्या प्राचीन वंशावळींच्या कथा, गाथा, आख्याने आलेल्या आहेतच पण त्याशिवाय त्यात धर्म, तत्त्वज्ञान, व्यवहार, राजनीती यांचे जागोजाग विस्तृत वर्णन आले आहे. म्हणूनच ग्रंथारंभी केलेली महाभारताची प्रशंसा त्याला यथार्थत्वाने लागू पडते. असे म्हटले आहे...

**धर्मे चार्थे च कामे च मोक्षे च भरतर्षभ ।**
**यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत् क्वचित् ।।**

"हे पुरुषश्रेष्ठा, धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चारी पुरुषार्थांविषयी प्रस्तुत ग्रंथात जे लिहिले आहे, तेच अन्य सर्व ठिकाणी आढळेल. आणि जे या ग्रंथात नाही ते अन्यत्र कुठेही आढळणार नाही."

अठरा दिवसांचे भारतीय युद्ध संपले. पांडवांना जय मिळाला. धर्मराजाचा राज्याभिषेक झाल्यानंतर महर्षी व्यासांना वाटले की, कौरव-पांडवांचा हा इतिहास ग्रंथनिविष्ट करावा. या ग्रंथलेखनासाठी निवांतपणा मिळावा म्हणून ते हिमालयात बदरीनारायण या क्षेत्री गेले. सतत तीन वर्षे लेखनोद्योग करून 'जय' नावाचा ग्रंथ सिद्ध केला. या ग्रंथात कौरव-पांडवांच्या उत्पत्तीपासून तो भारतीय युद्धापर्यंतचा इतिहास व्यासांनी ग्रंथनिविष्ट केला आहे.

अशा महाभारताचा कर्ता व्यास हे ऋषीतले महर्षी होते. त्यांनी वेदराशीचे विभाजन केले, म्हणून त्यांना 'वेदव्यास' म्हणतात. समस्त वैदिक आचार्यांनी त्यांना भगवान या उपाधीने गौरविले आहे. व्यास हे वसिष्ठाच्या कुळातले होते. वसिष्ठ > शक्ती > पराशर > व्यास अशी त्यांची पैतृक परंपरा आहे. व्यासांचा जन्म व चरित्र हेही तितकेच अद्‌भुततामय आहे. व्यास आणि कर्ण दोघेही कानीन म्हणजे कुमारीपुत्र. दोघेही जन्मतःच टाकलेले. कर्णाने कुंतीची भेट झाल्यावेळी कुंतीचा अधिक्षेप केला, पण व्यासांनी सत्यवतीला कधी एका शब्दानेही

दुखावले नाही. व्यासांनी इथे नियतीची सत्ता मान्य केली. व्यासांनी आपल्या जीवनातील कोणत्याही गोष्टी लपवल्या नाहीत. ते जन्मभर सत्याशी प्रामाणिक राहिले.

भारतीय संस्कृतीचे सर्वार्थांनी सम्यक् दर्शन घ्यायचे असेल तर व्यासरचित ग्रंथांचे अध्ययन करणे अपरिहार्य आहे. ''व्यासोच्छिष्टं जगत्सर्वम्'' अशी लोकोक्ती त्यामुळे रूढ झाली आहे. व्यासनिर्मित व व्याससंवादित ग्रंथांना मिळून व्यासचर्या म्हणतात. या व्यासचर्येच्या अध्ययनाने मनुष्याचा आत्मा शुद्ध व विशद बनतो असे वराह पुराणात म्हटले आहे.

महर्षी व्यासांनी वेदविभाजनाचे कार्य करून चार वेदांच्या चार वेगवेगळ्या संहिता तयार केल्या. त्याचप्रमाणे ब्रह्मसूत्रे किंवा वेदांतसूत्रे ही व्यासांची आणखी एक महनीय कृती होय. वेदांनी भगवंताच्या ज्या निर्विशेष स्वरूपाचे प्रतिपादन केले, ते उलगडून सांगणारे एखादे दर्शन व्यासांच्या काळापर्यंत सिद्ध झाले नव्हते. व्यासांनी ब्रह्मसूत्रांच्या द्वारे ते काम पूर्ण केले. या ग्रंथात त्यांनी अध्यात्माचे सिद्धांत सूत्ररूपाने ग्रथित केले आहेत. पुराणनिर्मिती हेही व्यासांचे एक अलौकिक कार्य आहे. व्यासांच्या या सर्व ग्रंथनिर्मितेच्या मुळाशी त्यांची एक स्वतंत्र दृष्टी आहे. व्यासांच्या या स्वतंत्र दर्शनाचा केंद्रबिंदू केवळ ईश्वर नसून मानव आहे. म्हणूनच सर्व ग्रंथांतून व्यासांनी मानवाला ठायी ठायी पुरुषार्थाची प्रेरणा दिली आहे. त्यांनी एका ठिकाणी स्पष्टच म्हटले आहे –

''गुह्यं ब्रह्म तदिदं ब्रवीमि
न इह मानुषाच्छ्रेष्ठतरं हि किंचित् ।।''

''मी हे रहस्यज्ञान तुम्हांला सांगतो. या जगात मनुष्यांहून दुसरे श्रेष्ठ काहीही नाही.''

जे मनुष्याच्या ऐहिक व पारलौकिक उन्नतीला उपकारक ठरेल तेच खरे ही त्यांची भूमिका होती. मानवी जीवनाची पूर्णता होण्यासाठी आध्यात्मिक साधना जितकी आवश्यक तितकीच लौकिक समृद्धीही आवश्यक आहे, अशी त्यांची धारणा होती.

यामुळेच वेदोत्तर काळापासून आजतागायत व्यास हे भारतीय संस्कृतीचे महाप्राण ठरले आहेत.





# गीता व महाभारत कथा

ज्या युद्धाच्या निमित्ताने गीता सांगितली गेली ते भारतीय युद्ध कोठे, कसे व कोणात लढले गेले याचे निदान विहंगमावलोकन होणे जरुरीचे आहे. गीता समजून घेताना अठरा दिवस लढलेल्या या युद्धातील प्रमुख पात्रांची तोंडओळख होणे हेही तितकेच आवश्यक आहे.

गीतेच्या पहिल्याच श्लोकात जेथे भारतीय युद्ध झाले त्या कुरुक्षेत्राचा उल्लेख आहे. कुरुक्षेत्र हरयाणामध्ये आहे. दिल्ली ते कुरुक्षेत्र हे अंतर १५६ कि. मी. आहे. वास्तविक पाहता दिल्ली हे शहरच मुळी कुरुक्षेत्र मैदानावर वसलेले आहे. कुरुक्षेत्राला धर्मक्षेत्र का म्हटले आहे, याबद्दलचा कथाभाग महाभारताच्या शल्यपर्वात आला आहे. कुरू नावाचा राजा व कौरव-पांडवांचा पूर्वज या क्षेत्रात मोठ्या कष्टाने शेती करीत असे. त्याचे कष्ट पाहून इंद्राला दया आली व त्याने असा वर दिला की, येथे जे तपश्चर्या करतील अथवा युद्धात वीरगती पावतील त्यांना स्वर्गप्राप्ती होईल. इंद्राच्या वरानंतर कुरू राजाने शेती करण्याचे बंद केले. इंद्राच्या वरामुळे कुरुक्षेत्राला धर्मक्षेत्र हे नाव पडले. कौरव-पांडवांच्या युद्धात धर्माचा रक्षणकर्ता श्रीकृष्ण हा साक्षी होता व तो धर्माने आचरण करणाऱ्या पांडवांच्या बाजूने होता. या कारणास्तवही धर्मक्षेत्र हे विशेषण कुरुक्षेत्राला शोभून दिसते. मनुस्मृतीमध्ये (२.१९) कुरुक्षेत्राला ब्रह्मर्षी देश म्हणजे ब्रह्मर्षींनी राहण्यास योग्य देश असे म्हटले आहे. कौरव-पांडवांच्या युद्धाच्या वेळी कुरुक्षेत्राचा विस्तार सुमारे दोनशे मैल लांब व दोनशे मैल रुंद एवढा प्रचंड होता. कौरवांकडे अकरा अक्षौहिणी व पांडवांकडे सात अक्षौहिणी असे एकूण अठरा अक्षौहिणी सैन्य या विस्तीर्ण युद्धभूमीवर होते. एका अक्षौहिणीत रथात बसून लढणारे तसेच हत्तीवर, घोड्यावर बसून लढणारे आणि पायदळ मिळून २ लक्ष १८ हजार सातशे वीर असत. ही संख्या उद्योगपर्वात सांगितली आहे. युद्धाच्या वेळी सैन्य कसे उभे करावे, हे शांतिपर्वात सांगितले आहे. सैन्याच्या अग्रभागी हत्ती, त्याच्यानंतर रथ, त्याच्यामागे घोडदळ व घोडदळाच्या मागे पायदळ अशी सैन्यरचना असे. गीतेच्या पहिल्याच श्लोकात धृतराष्ट्राने संजयास कुरुक्षेत्रावर युद्धासाठी जमलेल्या माझ्या आणि पांडूच्या पुत्रांनी काय केले, असा प्रश्न केला. संजय हा सूतपुत्र होता व अंध धृतराष्ट्राचा सारथी होता. युद्ध सुरू होण्याच्या अगोदर

महर्षी व्यास धृतराष्ट्राकडे गेले व त्यांनी त्याला सांगितले की, तुझी युद्ध पाहायची इच्छा असल्यास मी तुला दिव्य दृष्टी देतो. परंतु आपल्या कुळाचा होणारा संभाव्य नाश मला पाहायची इच्छा नाही असे त्यांनी उत्तर दिले. तेव्हा व्यासांनी संजयास दिव्य दृष्टी दिली व त्याने बसल्या ठिकाणी युद्धाचे प्रत्यक्ष वर्णन धृतराष्ट्राला सांगितले.

गीतेतील पहिल्या अध्यायात श्लोक २ ते ११ मध्ये या भारतीय युद्धात सहभागी झालेल्या प्रमुख वीरांचे वर्णन केले आहे. दोन्ही सैन्यांकडे रथी, महारथी होते. रथी म्हणजे रथात बसून युद्ध करणारा. महारथी म्हणजे एकाच वेळी दहा हजार धनुर्धरांशी जो युद्ध करतो तो. गीतेमध्ये ज्या प्रमुख वीरांचा उल्लेख आहे त्यातील कौरवांच्या बाजूने असणाऱ्यांमध्ये, द्रोणाचार्य हे उभय पक्षांचे गुरू होते. तर दोघांचेही पितामह भीष्म तसेच दुर्योधनाचा प्रिय मित्र कर्ण, द्रोणाचार्यांचा पुत्र अश्वत्थामा, दुर्योधनाचा भाऊ विकर्ण, द्रोणाचार्यांच्या पत्नीचा भाऊ कृप हे कौरवांच्या बाजूने लढत होते. पांडवांच्या बाजूने लढणाऱ्या वीरांमध्ये द्रुपदपुत्र धृष्टद्युम्न, अभिमन्यूचा सासरा व उत्तरेचे वडील विराट, पांडवांचा सासरा द्रुपद, शिशुपालाचा मुलगा व चेदि देशाचा राजा धृष्टकेतु, काशी देशाचा राजा काशी, धर्म, भीम, अर्जुन यांचा मामा पुरुजित कुंतीभोज, शिबि देशाचा राजा शैब्य, सुभद्रेचा पुत्र अभिमन्यू, पांचाल देशवासी युधामन्यू, एक यादव चेकितान अशा वीरांचा सहभाग होता.

युद्ध सुरू होण्याअगोदर भीष्माचार्यांनी शंख वाजविला व त्याचबरोबर रणवाद्यांचा घनघोर आवाज झाला. त्यानंतर श्रीकृष्णाने पांचजन्य, अर्जुनाने देवदत्त, भीमाने पौंड्र, युधिष्ठिराने अनंतविजय, नकुलाने सुघोष व सहदेवाने पुष्पक शंख वाजविले. इतर वीरांनीही आपापले शंख वाजविले.

घनघोर युद्धाला प्रारंभ झाला. प्रश्न असा पडतो की, हे महाभयंकर, प्रलयंकारी भारतीय युद्ध श्रीकृष्णाला टाळता आले असते का? प्रत्यक्ष भगवंताला नियतीचे चक्र फिरवता आले नसते का? अशी कोणती अगतिकता, अपरिहार्यता आली की, त्यामुळे हा मानवसंहार श्रीकृष्णालासुद्धा टाळता आला नाही? दैवी गुणांत पुनःपुन्हा अहिंसेची प्रशंसा करणाऱ्या श्रीकृष्णाने या हिंसेची परिभाषा कशी केली आहे?

महाभारताच्या कथेच्या संदर्भात या प्रश्नांची उत्तरे शोधण्याचा आपण प्रयत्न करू. गीतेचा उपदेश समजून घेण्यासाठी हे आवश्यक आहे. कथेचा सारांश त्यातच सामावला आहे.

- भीष्माने धृतराष्ट्र व पांडू या दोघांतून पांडूला राज्यसिंहासनावर बसविले, हे संघर्षाचे पहिले निमित्त. पांडवांचे हस्तिनापुरात येणे कौरवांना मुळीच आवडले



नव्हते. त्यामुळे ते सतत पांडवांचा दुःस्वास करीत. भीम महाशक्तिशाली असल्याने त्याला ठार करण्याचा प्रयत्न कौरवांनी अनेकवार केला. एकदा भीमाला अन्नातून विष चारले व मूर्च्छा आल्यानंतर हातपाय बांधून यमुनेत लोटून दिले. दैव बलवत्तर म्हणून नागांनी त्याला वाचविले. कौरव-पांडवांतील आंतवैर हळूहळू वाढतच गेले. त्यामुळे भीष्माने त्यांना वेगळे करण्याचे ठरविले. धृतराष्ट्राला ही गोष्ट खूपच आवडली. त्याने पांडवांना वारणावनात जाऊन राहण्याचा साळसूद सल्ला दिला. पांडव कुंतीमातेसह तिकडे जायला निघाले. पण इथे आनंदित झालेल्या कौरवांनी वेगळेच षड्यंत्र रचले. पांडवांना जाळून मारण्यासाठी ज्वालाग्राही पदार्थांचे एक लाक्षागृह तयार केले. या कटाचा सुगावा विदुराला लागल्यामुळे पांडव वाचले. कौरवांना वाटले की, पांडव लाक्षागृहाच्या आगीत जळून खाक झाले. काही काळ पांडवांनी अज्ञातवासात घालविला.

पुढे द्रुपदराजाकडे द्रौपदीच्या स्वयंवरात मत्स्ययंत्राचा भेद अर्जुनाने केल्यानंतर द्रौपदीने त्याच्या गळयात माळ घातली. पांडव मेले नसून जिवंत आहेत आणि आता द्रुपदाशी सोयरीक केली आहे हे धृतराष्ट्राला कळले. त्याने पांडवांना पुनश्च हस्तिनापूरला बोलावून घेतले. पुन्हा कौरव-पांडवांचे आंतवैर धुमसू लागले. म्हणून भीष्माने राज्याची वाटणी केली. पांडवांना इंद्रप्रस्थ ही राजधानी नेमून देऊन त्यांना तिकडे पाठविले. काही काळ पांडवांना सुखाचा गेला. तेवढ्या अवधीत द्रौपदीला पाच पुत्र व सुभद्रेला अभिमन्यू नावाचा पुत्र झाला.

पुढे धर्मराजाने राजसूय यज्ञ केला. यज्ञसमाप्तीच्या वेळी श्रीकृष्णाला अग्रपूजेचा मान दिला. ही गोष्ट शिशुपालाला आवडली नाही. त्याने भीष्म व कृष्णाची निंदानालस्ती केली. कृष्णाने हे निमित्त साधून त्या खलदुर्जन शिशुपालाचा वध केला. पांडवांनी मयसभेचे आयोजन केले होते. दुर्योधनाला ती मयसभा पाहायची होती. एका ठिकाणी भूमी समजून तो सरळ पाण्यातच पडला. सर्व पांडव हसले. त्या वेळी द्रौपदी म्हणाली, "अंधपुत्र खराच!" हा उपहास दुर्योधनाच्या जिव्हारी लागला. हस्तिनापुरात आल्यानंतर द्वेषाग्नीने पेटलेल्या दुर्योधनाने शकुनीला बोलावून द्युत खेळण्याचे कपट रचले. कसेही करून पांडवांना भिकेला लावायचे, हा बेत त्यांनी रचला.

द्युतात पांडव हरले. द्रौपदीलासुद्धा पणाला लावले. पुन्हा सूडाचे राजकारण पेटले. द्रौपदीच्या वस्त्रहरणाचा किळसवाणा प्रकार घडला. केवळ राज्यच गेले नव्हे तर बारा वर्षांचा वनवास पांडवांच्या नशिबी आला. वनवासाला जाताना पांडवांनी कौरवांच्या नाशाच्या घनघोर प्रतिज्ञा केल्या.

पुढे बारा वर्षांचा वनवास संपला. शेवटचे वर्ष अज्ञातवासात घालविण्यासाठी यमाच्या आदेशाप्रमाणे सर्व पांडव विराटनगरीत आले. हे वर्ष संपण्यापूर्वी

कीचकवधाची घटना घडली. कौरवांनी ओळखले की हे काम केवळ भीमच करू शकतो. लगेच कौरवांनी विराटावर स्वारी केली. पांडवांचा अज्ञातवास पूर्णपणे संपल्यानंतरच दुर्योधनाला त्यांची ओळख लागल्यामुळे कौरवांच्या पदरी घोर निराशा आली.

आता पांडवांचे राज्य त्यांना पुनश्च मिळावे म्हणून श्रीकृष्णाने पांडवांची सभा घेतली. खूप विचार झाला. शेवटी कौरवांकडे दूत पाठवून राज्याची मागणी करावी असे ठरले. त्यानुसार कृष्णाने द्रुपदाच्या पुरोहिताला कौरवांकडे दूत म्हणून पाठविले. कौरवांनी उत्तर दिले, ''आम्ही आमचा दूत पाठवून तुम्हांला आमचा विचार कळवू.''

या सगळ्या वाटाघाटीच्या काळात पांडवांनी आपला मुक्काम उपप्लव्य नगरात ठेवला होता. कौरव युद्धाची तयारी करीत आहेत आणि देशोदेशींच्या राजांना आपल्या पक्षाला येऊन मिळण्याविषयी निमंत्रणे धाडीत आहेत, असे पांडवांना कळले. पांडवही मग त्याच प्रयत्नाला लागले. त्यासाठीच अर्जुन व दुर्योधन द्वारकेला गेले. कृष्णाने आपल्या मदतीचे दोन भाग केले – एक भाग म्हणजे समस्त यादवसैन्य आणि दुसरा भाग म्हणजे एकटा निःशस्त्र श्रीकृष्ण. दुर्योधनाने आपल्या स्वभावानुसार यादवसैन्याची मागणी केली व अर्जुनाने आपला प्रिय सखा, गुरू, प्रभू अशा श्रीकृष्णाचा आनंदाने स्वीकार केला.

या दरम्यान धृतराष्ट्राचा दूत पांडवांकडे आला. त्याने धर्मापुढे अहिंसेचे स्तोत्र सुरू केले. ''युद्ध सुरू झाले तर फार मोठा मानवसंहार होईल आणि त्यात आप्तस्वजनही मरतील. तरी तुम्ही हे महापातक आपल्या शिरावर घेऊ नये,'' असे संजयाने धर्माला विनविले. त्यावर धर्मराज म्हणाले, ''आम्ही आपत्काली भिक्षा मागितली. यापुढे ती गोष्ट करणार नाही. याऊपर श्रीकृष्ण सांगेल ते आमचे उत्तर!'' श्रीकृष्णाने त्या दूताला लगेच उत्तर दिले, ''तुमच्याप्रमाणेच आम्हांलाही शांतता हवी आहे. पण ती सन्मानाने हवी आहे. त्यासाठी पूर्वीप्रमाणे इंद्रप्रस्थाचे राज्य कौरवांनी पांडवांना द्यावे आणि समेट करावा.''

संजयाने हे ऐकून घेऊन पुन्हा एकदा धर्माला त्याचे उत्तर विचारले. धर्माने या वेळी स्पष्ट शब्दांत न्याय्य, वाजवी अशी मागणी केली. तो म्हणाला, ''मागचे सारे अपराध विसरून मी दुर्योधनाला क्षमा करायला तयार आहे. त्याने आमचा भाग आम्हांला द्यावा. ते शक्य नसेल तर निदान पाच गावे आम्हांला द्यावीत तेवढ्यावर आम्ही संतुष्ट राहू!''

पण धर्मराजाची एवढी साधी, अल्पशी मागणीही कौरवांनी मान्य केली नाही. धर्माला युद्ध टाळायचे होते म्हणून शेवटचा उपाय म्हणून कृष्णाने शिष्टाईसाठी कौरवांकडे जावे अशी त्याने विनंती केली. त्यानुसार श्रीकृष्ण सात्यकीला घेऊन



हस्तिनापूरला आला. कौरवांच्या सभेत त्याने मुद्देसूद, प्रभावी भाषण केले. तो म्हणाला, ''धृतराष्ट्रा, तू अर्धे राज्य पांडवांना दे आणि युद्धात होणारा नरसंहार थांबव. पांडव समेटाला तयार आहेत. तसे युद्धालाही तयार आहेत. यातले काय स्वीकारायचे ते तू ठरव.'' त्यावर दुर्योधन खवळून बोलला, ''मी पांडवांना अर्धे राज्य काय, पाच गावे काय, पण सुईच्या अग्रावर राहील एवढी मातीही देणार नाही!''

त्यावर श्रीकृष्ण तितक्याच स्पष्टपणे बोलला, ''ठीक आहे. यापुढे युद्ध सुरू झाले तर त्याचा दोष पांडवांकडे नाही, एवढे लक्षात ठेव!''

या शिष्टाईत कृष्णाचे काहीही साध्य झाले नाही. शिष्टाई फसल्याचे धर्मराजाला अतीव दुःख झाले, पण नाखुषीने आपल्या बंधूंना युद्धाची अनुमती दिली.

आणि कुरुक्षेत्रावर युद्धाला तोंड फुटले. कौरवांनी भीष्माला आपला सेनापती नेमले व पांडवांनी द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नाला आपले सैनापत्य दिले. एकूण अठरा दिवस कुरुक्षेत्रावर हे युद्ध झाले.

महाभारतातील हे युद्ध सत्य-असत्य, धर्म-अधर्म, न्याय-अन्याय, दैवी गुण-असुरी संपत्ती, सुष्टता-दुष्टता, सज्जन-दुर्जन, सत्-असत् यामधील होते. पांडवांकडे उत्तम संस्कार होते, पण कौरवांतील सात महारथी हे सात विकारांचे प्रतिनिधी होते.

दुर्योधन लोभाचे प्रतीक! आपल्या वाटणीचे राज्य तर भोगायचेच पण भावांच्या राज्याचा मोह सोडायचा नाही. कर्ण हे अहंकाराचे प्रतीक. माझ्यापेक्षा शूर-वीर कोणी नाही. अर्जुनाला पराभूत करण्यास उतावीळ झालेला कर्ण आपल्यापेक्षा कोणी श्रेष्ठ नाही अशा भ्रमातच वावरत होता. भीष्म म्हणजे मोह-ममतेचे प्रतीक! केवळ मोहाने आंधळा झालेला भीष्म व ममतेने आधीच असलेला आंधळा धृतराष्ट्र हे दोघे सारखेच दोषी. मत्सर, ईर्ष्या याचे मूर्तिमंत प्रतीक म्हणजे शकुनी. अश्वत्थामा म्हणजे क्रोध! आपल्या पित्याच्या मृत्यूचा बदला घेण्यासाठी सूडाने पेटलेला अश्वत्थामा हे क्रोधाचे प्रतीक आहे. स्वतः द्रोणाचार्य म्हणजे साकार मद! केवळ आपत्ती काळात अन्नभक्षण केले म्हणून कृतज्ञतेच्या भावनेपोटी चांगले-वाईट, नीती-अनीती हे पूर्णपणे विसरून दुर्योधनाच्या पक्षात युद्धासाठी सज्ज झाले. दुःशासन म्हणजे काम! द्रौपदीला भर सभेमध्ये अपमानीत करून तिचा पदर धरणारा दुःशासन कामाने अंध, उन्मत्त झाला होता.

कौरवांचे हे सात महारथी म्हणजे काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, अहंकार या विकारांनी आत्मनाशाकडे निघालेले दुष्टतेचे धनी होते. तर पांडव व सारथी कृष्ण म्हणजे धर्माचे व दैवी गुणांचे व सुसंस्कारांचे प्रतीक होते. यासाठी वानगीदाखल एक उदाहरण सांगता येईल. युद्ध सुरू होण्यापूर्वी धर्मराज आपल्या भावांना बरोबर घेऊन भीष्म-पितामहांचा आशीर्वाद घेण्यासाठी त्यांच्या छावणीत

गेला. अभिवादन करून म्हणाला, ''पितामह, मला युद्धाची अनुज्ञा असावी.'' हे ऐकून भीष्म सद्गतीत होऊन म्हणाले, ''युधिष्ठिरा, तुझा पक्ष सत्याचा आहे आणि सत्याचाच विजय होईल असा माझा तुला आशीर्वाद आहे.''

विनम्रता, सद्गुण यांचा हा विजय आहे. म्हणूनच कृष्णानेसुद्धा अर्जुनाच्या रथाचे सारथ्य केले.

महाभारतात असे एकही पात्र नाही की जे प्रत्यक्ष जीवनात पाहायला मिळणार नाही. महर्षी व्यासांनी मानवी जीवनातील सर्व कंगोरे उलगडून दाखविले. जीवन हेसुद्धा कुरुक्षेत्रच आहे. पण त्याचे धर्मक्षेत्र बनविणे हा खरा पुरुषार्थ आहे. भगवंतालासुद्धा दुष्टांचा संहार करण्यासाठी व सज्जनांचे रक्षण करण्यासाठी अवतार घ्यावा लागतो. श्रीकृष्णालासुद्धा हे युद्ध टाळता आले नाही त्याचे हेच कारण आहे.





# भगवान श्रीकृष्ण व अर्जुन

भगवद्गीता समजण्यासाठी भगवान श्रीकृष्ण व अर्जुन यांचे जीवन-चरित्र समग्रतेने जरी नसले तरी त्यांच्या ठळक पैलूंचे दर्शन घेणे आवश्यक आहे. महाभारतकथेचे व महर्षी व्यासांचे जीवन व त्यांच्या कार्याचे विहंगमावलोकन जसे आपण पाहिले त्याचप्रमाणे या दोघांच्याही अवतार-कार्याचे मर्म थोडक्यात समजून घेऊ.

संपूर्ण भगवद्गीतेत केवळ पहिल्या अध्यायात युद्धाचे ओझरते वर्णन आले आहे. त्यानंतर कुठेही युद्धाचा उल्लेख नाही. मानवी जीवनाचे तत्त्वज्ञान हाच गीतेचा प्रधान विषय आहे, पण ज्या परिस्थितीत या युद्धाला तोंड फुटले त्याची कारणे समजल्याशिवाय कृष्ण व अर्जुन यांना यथार्थपणे कळणे कठीण आहे.

श्रीमद्भागवत, महाभारत, हरिवंश या ग्रंथांतून श्रीकृष्णाचे जीवन-चरित्र वर्णन करण्यात आले आहे. भगवान श्रीकृष्णाचे जीवन सर्वांगपूर्ण अशा लीलांनी नटलेले आहे. अखिल ब्रह्मांडाचा नायक जगाच्या कल्याणासाठी मानवरूपाने अवतीर्ण होतो हे तत्त्वदर्शन भारतीय अध्यात्मशास्त्राचे वैशिष्ट्य आहे. गीतेत कृष्णांनी आपल्या अवतार रहस्याचा उल्लेख स्पष्ट केला आहे. दुष्टसंहारक, सज्जनरक्षक, धर्मसंस्थापक, कुशल सेनानी, आदर्श प्रशासक, आध्यात्मिक जगद्गुरू अशा विविध पैलूंनी कृष्णाचे जीवन अलंकृत आहे. कर्ममय जीवनाच्या धुमश्चक्रीत अनासक्त कसे राहायचे याचा आदर्श वस्तुपाठ कृष्णाच्या जीवनात ठळकपणे दिसतो. यास्तव वैष्णव संप्रदायामध्ये श्रीकृष्णांना 'पूर्णावतार' म्हटले आहे.

श्रीराम व श्रीकृष्ण हे श्रीविष्णूचे अवतार. श्रीविष्णूच्या दहा अवतारांमध्ये श्रीकृष्ण हा आठवा अवतार.

महाभारताच्या भीष्म पर्वात युद्ध सुरू असताना पांडवांचा विजय का होत आहे असे दुर्योधनाने विचारल्यावरून भीष्मांनी त्याला श्रीकृष्णाचे स्वरूप व माहात्म्य विस्ताराने सांगितले. 'जेथे कृष्ण तेथे विजय' हा निष्कर्ष प्रगट केला. महाभारतात अनेक प्रसंगी देव, ऋषी, भक्त अशा अनेकांकडून श्रीकृष्णाच्या स्वरूपाचे वर्णन आले आहे. या सर्वांचे तात्पर्य हेच की, भगवान श्रीकृष्ण सगुण, साकार ब्रह्मच होत.

योगेश्वर श्रीकृष्ण हा वसुदेव-देवकीचा आठवा पुत्र. याचा जन्म मथुरेत कंसाच्या बंदीखान्यात झाला. श्रावण वद्य अष्टमीच्या मध्यरात्री. त्याचा जन्म होताच कंस त्याला मारील या भयाने वसुदेवाने गुप्तपणे त्याला गोकुळात नंदाच्या घरी नेऊन ठेवले. त्यामुळे यशोदा ही त्याची दुसरी माता झाली.

कृष्णाचे बालजीवन म्हणजे नितांत रमणीय असे काव्य आहे. गोकुळातल्या बाललीलांनी व वृंदावनातल्या गोचारणांनी प्राचीन काळापासून आजतागायत अनेक कवींना मोहवून टाकले आहे. गोकुळातल्या गोपी, गायी, मुरलीवादन, रासनृत्य, दूध-दही-लोणी यांच्या चोरीचे विषय हे अभिजात काव्यांना स्फूर्ती देणारे ठरले.

कृष्ण गोकुळात वाढतो आहे असे समजल्यावर कंसाने त्याच्यावर पुतनामावशीसह अनेक मारेकरी घातले, पण कृष्णाने त्या सर्वांना भुईसपाट केले. शेवटी मथुरेत जाऊन कंसाचाही शिरच्छेद केला. त्याने कंसाचा बाप उग्रसेन याला बंदिवासातून मुक्त करून मथुरेच्या राज्यावर बसविले. मगधसम्राट जरासंध याने कंसाच्या वधाचा सूड घेण्यासाठी मथुरेवर सतरा वेळा स्वाऱ्या केल्या. कृष्णाने त्याचा पुरेपूर समाचार घेत त्या सर्व परतावून लावल्या. जरासंध हा कंसाचा सासरा होता. शेवटी अठराव्यांदा स्वारी करण्यासाठी कालयवनाला त्याने आपल्या मदतीस बोलावले. कृष्णाने मुत्सद्दीपणाने व राजकारणचातुर्याने यादवांचा संहार टाळण्यासाठी मथुरा सोडून सौराष्ट्राला पलायन केले. म्हणून कृष्णाचे रणछोडदास असेही नाव पडले. तिथे श्रीकृष्णाने पश्चिम सागरात अभेद्य अशी द्वारका नगरी वसविली.

'कृष्ण' म्हणजे 'कर्षति आकर्षति इति कृष्ण.' जो खेचतो, आकर्षून घेतो तो कृष्ण. कृष्णाने सत्ता व संपत्तीशिवाय गोकुळातल्या सर्वांना एकत्रित करून त्यांचे प्रेम संपादन केले. त्यामुळेच वर्षानुवर्षे परंपरेने चालत आलेली इंद्रपूजा तोडून गोवर्धनाची पूजा सुरू केली. दैवी संस्कृतीच्या रक्षणासाठी दुर्योधन, कंस, कालयवन, नरकासुर, शिशुपाल, जरासंध यांच्यासारखे जडवादी, आसुरी प्रवृत्तींचे समाजशत्रू यांचा धर्म व नीती यांचे सुदर्शन चक्र हातात घेऊन नाश केला.

द्रौपदीच्या स्वयंवरप्रसंगी पांडवांशी कृष्णाची गाठ पडली ती कायमचीच होऊन गेली. सत्प्रवृत्त पांडवांना हाताशी धरून त्याने या संस्कृतीचे रक्षण केले. पांडवांच्या राजकारणाची सर्व सूत्रे त्यानेच हालवली. एवढे सर्व करून कृष्णाने सर्व ठिकाणी कमालीची अनासक्ती दाखविली. कंसवध केल्यानंतर मथुरेच्या सिंहासनावर तो सहजपणे आरूढ होऊ शकला असता, पण त्या जागी त्याने कंसाचा बाप उग्रसेन याला बसविले. जरासंधाच्या वधानंतर कृष्ण मगधाधिपती



सम्राट होऊ शकला असता, पण त्याने त्या पदावर जरासंधपुत्र सहदेव यालाच बसविले. राजसूय यज्ञानंतर धर्मराज त्याला म्हणाला होता, "आता हे साम्राज्य तूच सांभाळ! तुझ्याच कृपेने ते मला लाभले आहे." पण कुठेही कृष्ण मोहात पाडला नाही.

'सगुण मेघश्याम लावण्यसुंदर' अशा श्रीकृष्णाच्या सौंदर्याचे वर्णन कवींनी व संतांनी केले आहे. रुक्मिणीने आपल्या प्रेमपत्रात त्याला भवनसुंदर म्हटले आहे. गोपींना तर कृष्ण साक्षात मदनच वाटत होता. पण कृष्ण केवळ रूपसुंदर नव्हे तर अनेक गुणविशेषांचा, अलौकिक बुद्धिमत्तेचा मर्मग्राही तत्त्वज्ञ, व्यवहार-चतुर, धुरंधर राजकारणी व पराक्रमी होता. कृष्ण हा उत्तम वक्ता होता. कृष्णाचे महाभारतातले एकेक भाषण म्हणजे एक सुंदर, प्रभावशाली असा वाक्‌विलास आहे. शिष्टाईच्या वेळी धृतराष्ट्राच्या राजसभेत त्याने केलेले भाषण त्याच्या अमोघ वक्तृत्वाचा उत्कृष्ट नमुना आहे.

असा कृष्ण जेवढा व्यवहारनिपुण होता तेवढाच तो महान तत्ववेत्ताही होता. भगवद्‌गीतेत याचे स्पष्ट दर्शन आपल्याला घडते. म्हणूनच "कृष्णस्तु भगवान स्वयम्" असे म्हणून भागवत पुराणाने कृष्णाला विष्णुरूप मानले आहे. महाभारतात जो कृष्ण यादवांचा नेता व पांडवांचा हितकर्ता अशा मानवी रूपगुणांत दिसला तोच पुढे सकल मानवांचा उपास्य देव बनला. भीष्मपर्वातल्या नारायणीय उपाख्यानात परमपुरुषाला नारायण व विष्णू या दोन नावांनी संबोधिले असून हे दोघे व कृष्ण एकच आहेत असे म्हटले आहे. कृष्ण सोळा कलांनी युक्त असा पूर्णावतार होता. म्हणूनच कृष्णाला जगद्‌गुरू म्हणून स्वीकारले आहे. असा कृष्ण समस्त भारतीय संस्कृतीचा महाप्राण झाला आहे.

अशा कृष्णाला तेवढ्याच योग्यतेचा महान शिष्य लाभला. तो म्हणजे अर्जुन! शिष्य, सखा व गुरू ही तिन्ही नाती श्रीकृष्ण-अर्जुनाची होती. सव्यसाची हे अर्जुनाचे प्रमुख विशेषण. डाव्या, उजव्या दोन्ही हातांनी तो शरवर्षाव करीत असे. त्यामुळे त्याला हे विशेषण लाभले. असा धनुर्धर तोच एक होता.

अर्जुन हा कुंतीला इंद्राच्या मंत्राने प्राप्त झालेला तिसरा मुलगा. व्यासांनी अर्जुनाच्या व्यक्तिमत्त्वाचे सर्व पैलू चित्रसेन गंधर्वाच्या मुखाने वदविले आहेत. अर्जुन हा एक आदर्श विद्यार्थी होता. म्हणूनच द्रोणाचार्यांचे त्याच्यावर अतोनात, पुत्रवत् प्रेम होते. अभ्यासातली एकाग्रता हा त्याचा महान गुण होता. एकदा द्रोणाचार्याने एक कृत्रिम गिधाड निर्माण करून ते एका वृक्षावर मांडले. अर्जुन त्याच्यावर शरसंधान करायला निघाला असता द्रोणाने त्याला विचारले, "तुला झाड, गिधाड व मी हे सगळे दिसते काय?" त्यावर अर्जुन म्हणाला, "मला दुसरे काहीही दिसत नाही, मला फक्त गिधाडाचा गळा तेवढा दिसतो." अशी

ही एकाग्रता! अर्जुनाची गुरुभक्ती अलौकिक होती. द्रोणवध पाहून अर्जुनाची गुरुभक्ती उफाळून आली. धर्मराजाकडे जाऊन अर्जुन उद्वेगाने बोलला, ''तू धर्मज्ञ असूनही हा भयंकर अधर्म केलास. वालीच्या वधामुळे रामाची अपकीर्ती जशी झाली तशीच आचार्यांना मारून तू कायमचा अपकीर्तीचा धनी होशील.''

अर्जुन निष्ठावंत चारित्र्यवान होता. महाभारतात असे अनेक प्रसंग आहेत की जे याची साक्ष देतात. एक प्रसंग असा. विराटाच्या राजधानीत उत्तरेला नृत्य-नाट्य शिकविण्यासाठी बृहन्नडा या नावाने तो राहिला होता. अज्ञातवास संपल्यावर विराटराजाला त्याची खरी ओळख पटली. अर्जुनाने कौरवांच्या गोग्रहण प्रसंगातून आपल्याला वाचविले याबद्दलची कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी त्याने अर्जुनाला आपल्या मुलीशी-उत्तरेशी-लग्न करावयास विनविले. पण अर्जुन म्हणाला, ''राजा, उत्तरा ही माझी शिष्या आहे. गुरुला शिष्येचे पाणिग्रहण धर्मविहित नाही. तुझी तशीच इच्छा असेल तर मी माझ्या अभिमन्यूसाठी उत्तरेला सून म्हणून स्वीकार करीन.''

अर्जुनाची कृष्णभक्ती निःस्सीम होती. जिकडे कृष्ण तिकडे विजय ही त्याची खात्री होती. तसा अर्जुन दूरदर्शीही होता. एका बाजूला यादवसैन्य व दुसऱ्या बाजूला निःशस्त्र श्रीकृष्ण अशी वाटणी झाली असता अर्जुनाने कृष्णालाच मागून घेतले.

अर्जुनाचा महापराक्रम सर्वश्रुतच आहे. किरात वेशधारी शिवाचे आणि त्याचे युद्ध, हे त्याच्या पराक्रमाचे मूर्धन्य उदाहरण आहे. त्या युद्धाच्या शेवटी साक्षात शिवाने त्याचे गुणगान केले ते असे, ''अर्जुना, तुझ्या पराक्रमावर आणि शौर्य-धैर्यावर मी प्रसन्न आहे. तुझ्यासारखा दुसरा क्षत्रिय नाही.''

महाभारतात अर्जुन व कर्ण यांच्या शौर्याच्या अनेक कथा आहेत. कर्ण व अर्जुन यांची तुलना करताना कृपाचार्याने अर्जुनाचे अनेक पराक्रम अहंकारी कर्णाला ऐकविले आहेत. ते म्हणतात, ''कर्णा, उत्तर कुरूवर एकट्याने स्वारी करून अर्जुनाने त्यांना जिंकले. अर्जुन व कृष्ण या दोघांनी मिळून खांडववन अग्नीला भक्षायला दिले. त्याने स्वर्गात जाऊन एकट्याने देवांकडून अस्त्रे मिळविली. एकट्याने सुभद्राहरण केले. अजिंक्य अशा चित्रसेन गंधर्वाला एकट्याने पळायला लावले. देवांनाही अनाटोप ठरलेल्या कालखंज व निवातकवच या दानवांना त्याने एकट्याने यमलोकी धाडले.

अशा महापराक्रमी अर्जुनाला द्रौपदीपासून श्रुतकीर्ती, सुभद्रेपासून अभिमन्यू, चित्रांगदेपासून ब्रभ्रूवाहन आणि उलूपीपासून इरावान असे चार पुत्र झाले.

अर्जुन म्हणजे मूर्तिमंत ऋजुता. अत्यंत सरळ मनाच्या अर्जुनाने जेव्हा रणांगणावर आपलेच युद्धाभिलाषी स्वजन पाहिले, त्या वेळी त्याची गात्रे शिथिल



झाली, मुख कोरडे पडले, शरीराला कंप सुटला. करुणेने व्याप्त, अश्रूपूर्णनेत्र आणि शोकयुक्त अशा अर्जुनाला युद्ध करून स्वजनांना ठार करायचे नव्हते. अशा विजयाने मिळणारे राज्य, भोग व सुखे यांचा अर्जुनाने धिक्कार केला. अशा मोहग्रस्त, शोकाकुल अर्जुनाला उपदेश करण्यासाठी श्रीकृष्णाने गीता सांगितली. अर्जुनाला निमित्त केले व अखिल मानवजातीलाच दिव्य जीवनाचा महामंत्र दिला. अर्जुनाने संपूर्ण गीतेत जे प्रश्न विचारले आहेत ते आपले सर्वांचेच प्रश्न आहेत. म्हणून अर्जुन हा आपला प्रतिनिधीच आहे.

उपदेशाचा उपसंहार करून श्रीकृष्णांनी अर्जुनाला शेवटी विचारले, ''पार्था, तू हे सर्व एकाग्र चित्ताने ऐकलेस ना? तुझा हा अज्ञानजन्य मोह नष्ट झाला ना?'' यावर अर्जुनाने उत्तर दिले, ''हे अच्युता, तुझ्या कृपेने माझा मोह नष्ट झाला. मला स्वधर्माची स्मृती प्राप्त झाली. मी संदेहरहित झालो आहे. आता तुझ्या सांगण्याप्रमाणे करीन.''

'करिष्ये वचनं तव' हा भक्तीचा गाभा आहे. भगवंताच्या वचनाप्रमाणे आचरण करणे हा भक्तीचा मूलमंत्र आहे. त्याप्रमाणे अर्जुन युद्धाला सिद्ध झाला.

संपूर्ण गीतेचा प्रवास हा अर्जुनाच्या विषादापासून सुरू होतो व शेवटी प्रसन्नतेच्या, कृतार्थतेच्या वाटेवर संपतो. मानवी जीवनाचेही असेच आहे. जीवनातील शोक, मोह, शंका, भीती, विकारवशता मिटल्याशिवाय हृदयातील प्रसन्नतेचा झरा सापडणार नाही. आपल्या मूळच्याच आनंदस्वरूपाला प्राप्त करायचे असेल तर अर्जुनासारखे संपूर्ण शरणागत होऊन गीतेचे विचार आचरणात आणले पाहिजेत.



# अध्याय पहिला
# अर्जुनविषादयोग

श्रीमद्भगवद्गीता हा केवळ पारायणाचा ग्रंथ नसून तो आपल्या मानवी जीवनाशी सुसंवाद साधणारा व दैवी जीवन कृतार्थपणे कसे जगावे, ह्याचे मार्गदर्शन करणारा जीवनग्रंथ आहे. ह्यामुळेच जगातल्या अनेक संत-महंतांनी, युगपुरुषांनी ह्या ग्रंथाला शिरोधार्य मानले. गीतेच्या विचारांचा रोजच्या जीवनाशी किती अतूट संबंध आहे हे अध्यायवार दाखविण्याचा, माझ्या अल्पबुद्धीनुसार मी प्रयत्न करणार आहे. गीतारूपी सागरातील एक थेंबसुद्धा यथार्थाने प्राप्त झाला तरी मानवाच्या दुःखमय जीवनाला सुखाची किनार भेटल्याशिवाय राहणार नाही. पण श्रद्धायुक्त अंतःकरण असावे. 'श्रद्धावान् लभते ज्ञानम्'... ह्या उक्तीनुसार अहंकाराचे, उद्दामपणाचे जोडे बाहेर काढून गीतामंदिरात प्रवेश करू या. तरच हे विचार हृदयापर्यंत भिडतील.

गीतेची सुरुवातच धृतराष्ट्राच्या श्लोकाने होते,

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।**
**मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय ।।१।।**

मुलाच्या ममतेने वेडा झालेला धृतराष्ट्र संजयास म्हणतो, ''धर्माचे स्थान अशा कुरुक्षेत्रामध्ये जमलेले व युद्धाची इच्छा करणारे माझे पुत्र व पांडव ह्यांनी काय केले?'' गीतेची सुरुवातच ही अशी चिंतेने सुरू झाली आहे. काही जण ह्या अध्यायाला गौणस्थान देतात. पण त्या वेळची युद्धपरिस्थिती जाणून घेण्यासाठी व अर्जुनाची मोहग्रस्त, विवश मनोभूमिका समजून घेण्यासाठी ह्या अध्यायाचे महत्त्व आहे.

गीतेची योजना महाभारतात मध्यभागी आहे. एकीकडे सहा पर्वे, दुसरीकडे १२ पर्वे अशा मध्यभागी व एकीकडे सात अक्षौहिणी सैन्य तर दुसरीकडे अकरा अक्षौहिणी अशाही मध्यभागी भगवंताने गीता गायिली आहे. अर्जुन रणांगणावर उभा राहिला तो दृढनिश्चयानेच. क्षात्रवृत्ती त्याच्या नसानसात होती. 'सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ।।१.२१।।' असे म्हणत अर्जुनाने दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी आपला रथ उभा करावयास कृष्णास सांगितले. आपल्याबरोबर लढण्यासाठी कोण-कोण जमले आहेत, त्यांना पाहण्याची इच्छा अर्जुनाने व्यक्त केली आहे. कृष्णाची शिष्टाई व वाटाघाटीचे सर्व प्रयत्न व्यर्थ झाल्यामुळे युद्ध अपरिहार्य, अटळ होते.



अशा पार्श्वभूमीवर धृतराष्ट्राची संजयाला ही विचारणा आहे. गीता समजून घेताना ही पात्रे व त्यांच्या प्रवृत्ती ह्यांचे आकलन जरुरीचे आहे. धृतराष्ट्र म्हणजे ('धृतं राष्ट्रं येन सः।') ज्याने राष्ट्रसत्ता गिळंकृत केली आहे, असे लोक नेहमीच बाहेरून व आतूनदेखील आंधळे असतात. धृतराष्ट्र सर्वच काळे असतात. ते आजही आहेत व उद्याही असतील. कधी पुत्रप्रेमाने आंधळे तर कधी सत्तेने, कधी संपत्तीने तर कधी मोहाने. अनीतीने, दुष्टपणाने व न्यायनीती सोडून वागणारे सर्वच धृतराष्ट्र! लौकिक जगातील नश्वर गोष्टींनाच श्रेष्ठ मानून जगणारे चंगळवादी, भोगवादी, नास्तिकवादी, चार्वाकानुयायी हे धृतराष्ट्राचेच प्रतिनिधी. अशा तऱ्हेने जगणाऱ्या धृतराष्ट्राची संततीसुद्धा दुर्योधनासारखी 'दुः' म्हणजे दुष्ट अथवा दुःखी. अशीच नावे सर्वांची. ही नावे त्यांच्या दुष्ट प्रवृत्तीचीच द्योतक होत.

युधिष्ठिर व दुर्योधन दोघेही द्रोणाचार्यांचे शिष्य. दोघांनाही गुरूने एकसारखी विद्या शिकविली. दोघांची परीक्षा घेण्यासाठी एकदा गुरू द्रोणाचार्याने दोघाही शिष्यांना सांगितले, ''जगात जाऊन जेवढे सज्जन व दुर्जन असतील अशा लोकांची यादी तयार करून घेऊन या.'' दोघेही बाहेर पडले. जगात हिंडून आले. दोघांनीही कोरे कागद आणले. दुर्योधनाला गुरूने विचारले, ''काय जगात सज्जन माणसे भेटली?'' दुर्योधनाने उत्तर दिले, ''प्रत्येक माणसाच्या मनात डोकावले. कोणाच्याही अंतःकरणात चांगल्या गोष्टी आढळल्या नाहीत. आतून-बाहेरून सर्वजण दुष्ट स्वभावाचेच आहेत. आम्हीच केवळ सज्जन आहोत. त्यामुळे इतक्या सर्वांची नावे कशी लिहिणार? म्हणून कागद कोरेच आणले.'' युधिष्ठिराला जेव्हा विचारले त्या वेळी अत्यंत नम्रतेने तो म्हणाला, ''या जगात इतके लोक सज्जन आहेत, की त्यांची नावे लिहिण्यासाठी हे कागदच काय पण पृथ्वीचा कागद केला तरी अपुरा पडेल म्हणून मी नावे लिहिण्याचा उपद्व्याप केला नाही. आता राहता राहिले दुर्जन! तुमच्यासमोर उभा असलेला मीच काय तो एक दुर्जन आहे. माझ्यापेक्षा सर्व लोक या जगात सज्जन आहेत. त्यामुळे हे कागद मी कोरेच आणले.'' जशी दृष्टी, जसा स्वभाव तसे जग त्यांना दिसले. द्रोणाचार्यांनी हे उत्तर ऐकून सद्गतीत अंतःकरणाने युधिष्ठिराला मिठी मारली व म्हणाले की, या जगात तुझ्यासारखा शिष्य मिळाल्याने मी धन्य झालो आहे. मी शिकविलेल्या संस्कारांनी तू माझे नाव कीर्तिमान ठेवशील.

शंभर कौरव व त्यांना युद्धात साथ देणारा अंध पिता धृतराष्ट्र व पांडव या दोघांनाही कृष्णाचा सदैव सहवास मिळाला. पण कृष्णकृपेला पात्र राहिले ते पांडवच.

परमेश्वराची कृपा सर्वांवर सारखीच असते. मेघ जेव्हा बरसतात त्या वेळी ओसाड जमिनीवरही पाऊस पाडतात व सुपीक जमिनीवरही वर्षा करतात. एका जमिनीवर सुंदर फुले फुलतात, अन्न पिकते व ओसाड जमिनीवर काट्याची झुडपेच उगवतात. तसे द्रोणाचार्यांनी दोघांनाही तेच संस्कार दिले, पण दुर्योधनाच्या अंतःकरणात ईर्ष्या, द्वेष यांचे विषच निर्माण झाले.

आता दुसऱ्या बाजूस हृतराष्ट्र म्हणजे ज्याने राज्य गमावले आहे असे पांडव आहेत. द्यूताच्या वेळी असा करार झाला होता की, १२ वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास संपल्यानंतर राज्य परत देण्यात येईल. पण कराराप्रमाणे पांडवांना त्यांचे निम्मे राज्य देणे न्याय्य होते. परंतु युद्ध टाळावे म्हणून पांडव फक्त पाच गावांवर तडजोड करण्यास तयार झाले. याला कौरवांनी उत्तर दिले, ''सुईच्या अग्रावर - नव्हे तीक्ष्ण सुईच्या अग्रावर जेवढी माती राहील तेवढीदेखील पांडवांना युद्धाशिवाय मिळणार नाही.''

''**यावद्धि तीक्ष्णं सूच्या विध्येदग्रेण केशव ।**'' कोणताच मार्ग शिल्लक न राहिल्याने अन्याय सहन करण्याऐवजी कृष्णाने अर्जुनाला युद्ध करण्याचा सल्ला दिला.

पांडवांच्या न्याय्य अधिकाराव्यतिरिक्त महत्त्वाची अशी एक गोष्ट श्रीकृष्णाच्या मनात असली पाहिजे. ती ही की, दुर्योधन अधर्माचा प्रतिनिधी होता आणि युधिष्ठिर धर्माचा. कृष्णाला या जगात धर्माची प्रतिष्ठापना करावयाची होती. कृष्णाचा अवतारच यासाठी होता.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।।**
**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।। (गीता.४.७-८)**

यासाठी केवळ पांडवांच्या स्वतःच्या हितासाठीच नव्हे तर समाजाच्या व्यापक हितासाठी धर्महीन कौरवांच्या विरुद्ध पांडवांनी युद्ध करणे आवश्यक होते.

या पार्श्वभूमीवर अर्जुन शूर योद्ध्याप्रमाणे युद्धास तयार झाला. पण प्रत्यक्ष युद्धभूमीवर स्वतःच्या बांधवांना, गुरुतुल्य प्रियजनांना पाहून तो हतबल झाला. अर्जुनाची विवशता, मोहवशता, करुणा, व्याकुळता हीच कृष्ण - उपदेशाला कारणीभूत झाली. ही अवस्था अर्जुन अर्थपूर्ण शब्दांत स्वतःच व्यक्त करतो.

**''दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ।।**
**सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।।२८।।**
**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ।**
**गाण्डीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।।२९।।**



ह्या स्वजनांना पाहून माझी गात्रे शिथिल होत आहेत. तोंड कोरडे पडत आहे. शरीराला कंप सुटला आहे. रोमांच उभे राहिले आहेत. अशी अगतिकतेची अवस्था वर्णन करून पुन्हा म्हणतो,

**''न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।**
**किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेन वा ।।३२।।**

अशा स्वजनांना ठार करून मिळणारे राज्य काय कामाचे? ते सुख, विजय, राज्य मिळवून जगण्यात काय हशील, असा प्रश्न अर्जुनाने विचारला आहे.

'अर्जुन' शब्दाचा अर्थच ऋजु किंवा सरळ स्वभावाचा. कृष्ण-शरण असल्याने अर्जुनाने आपली सारी व्यथा कृष्णास कथन केली. अर्जुन धर्मसंमूढ झाला होता. स्वधर्माच्या बाबतीत त्याला मोह झाला. गीतेचा जन्म स्वधर्माच्या आड येणारी जी मोहवशता, आसक्ती, ममत्व हे दूर करण्यासाठीच आहे. मोह-निराकरण हे गीतेचे प्रमुख तात्पर्य आहे. गीतेच्या उपक्रमात मोह-उत्पत्ती व उपसंहारात मोहनिराकरण अशीच फलनिष्पत्ती निघते. मोहनिरास झाल्यानंतर 'करिष्ये वचनं तव' असे म्हणण्यापर्यंत भगवंताला अर्जुनाच्या मनात उत्पन्न होणाऱ्या अनेक शंकांचे समाधान करावे लागले.

अर्जुनाच्या अवस्थेचे वर्णन ज्ञानेश्वर माऊलींनी अर्थपूर्ण शब्दांत व्यक्त केले आहे. ते म्हणतात,

**''जैसा भ्रमर भेदी कोडे । भलतैसे काष्ठ कोरडे ।**
**परि कळिकेमाजी सापडे । कोवळिये ।।२०१।।**
**तेथे उत्तीर्ण होईल प्राणे । परि ते कमळदळ चिरू नेणे ।**
**तैसे कठिण कोवळेपणे । स्नेह देखा ।।२०२।।**

भुंगा ज्याप्रमाणे वाटेल त्या प्रकारचे लाकूड सहज लीलेने पोखरून टाकतो. पण कोवळ्या कळिकेमध्ये अडकून पडतो. तेथे तो प्राणासही मुकेल. पण कमळाच्या पाकळ्या चिरण्याचा विचारही त्यास शिवत नाही. अशा स्नेहाने अर्जुनाला घेरले. करुणेने अर्जुनातील वीरवृत्तीच नष्ट केली. ज्ञानेश्वर म्हणतात की, करुणारूपी कन्येने वीरवृत्ती कन्येला हाकलून लावून अर्जुनाच्या गळयात माळ घातली. अर्जुनाची कर्मप्रेरणाच नष्ट झाल्याने तो युद्धापासून परावृत्त झाला.

युद्धात गुरुवध, आप्तेष्टांची हत्या व कुलक्षय होणार म्हणून अर्जुन चिंतीत झाला व व्यामोहात सापडला. कुलक्षयाचे पाप हातून घडणार या धास्तीने तो व्याकुळ झाला. ज्यांच्यासाठी राज्याची, उपभोगांची व सुखांची इच्छा धरावयाची तेच हे जीवाची व संपत्तीची आशा सोडून युद्धाला उभे आहेत. (श्लोक ३३). या महत्पापापासून दूर राहण्यासाठी अर्जुन म्हणतो -

**कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।**
**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ।।४०।।**
**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसङ्करः ।।४१।।**
**सङ्करो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।**
**पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः ।।४२।।**
**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसङ्करकारकैः ।**
**उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ।।४३।।**
**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।**
**नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ।।४४।।**

''हे वृष्णिकुळात जन्मलेल्या कृष्णा, युद्धात कुळातील जाणते लोक मरण पावल्यामुळे परंपरेने चालत आलेले कुळधर्म करा असे सांगणारे कोणी उरत नाही. त्यामुळे कुळधर्म, कुळाचार नाहीसे होतात. कुळधर्म, रीतीरिवाज नाहीसे झाल्यामुळे कुळातील स्त्रिया बिघडतात. स्त्रिया बिघडल्यामुळे वेगवेगळ्या वर्गांतील स्त्री-पुरुषांचे अनैतिक संबंध येऊन समाजजीवन उद्ध्वस्त करणारा वर्णसंकर होतो.'' (श्लोक ४०-४१)

''हा संकर कुळाला अणि कुळघातकी लोकांना खात्रीने नरकालाच नेतो. शिवाय त्यांचे पूर्वज पिंडदान तर्पण इत्यादी धर्मकर्मे त्यांच्यासाठी न झाल्यामुळे नरकात पडतात.'' (श्लोक ४२)

''हे जनार्दना! कुळाचा घात करणारे वर्णसंकर निर्माण करतात. त्यांच्या या दुष्कृत्यामुळे प्राचीन काळापासून चालत आलेले जातींचे व कुळांचे आचार-विचार नाहीसे होतात. ज्यांच्या कुळधर्माचा नाश झाला, अशा माणसांना खात्रीने नरकात राहावे लागते, असे आम्ही ऐकले आहे.'' (श्लोक ४३-४४)

कुळक्षयापासून पुढे काय काय अनर्थ घडतात याचे वर्णन केल्यावर अर्जुनाला असे वाटले की, आपण निःशस्त्र अवस्थेत असताना कौरवांनी आपल्याला ठार केले तर आपले कल्याणच होईल. असा विचार करून शोकाने व्यथित झालेला अर्जुन धनुष्यबाण टाकून देऊन रथात स्वस्थ बसून राहिला.

अर्जुनाची कर्मप्रेरणाच येथे खलास झाली. अर्जुनाचा स्वार्थ संपला. युद्ध जिंकायचेच हा निर्धार सुटला. काही मिळवायचे आहे ही भावनाच संपली. कर्म करण्यासाठी कोणती प्रेरणाच शिल्लक राहिली नाही.

एखादा डॉक्टर ऑपरेशन थिएटरमध्ये गेल्यावर जर म्हणाला की, मी ऑपरेशन करणार नाही. मला रोग्याच्या वेदना पाहवत नाहीत. शस्त्रक्रिया उचित नाही, त्याचे रक्त सांडणे मला पसंद नाही; तर जी अवस्था होईल तशीच अवस्था अर्जुनाची झाली आहे.



अर्जुनाची 'जीवनी-शक्ती'च संपली. जीवन जगण्यासाठी, कर्मशील राहण्यासाठी लागणारी चेतना हरविल्यामुळे अर्जुन किंकर्तव्यमूढ झाला. जगाच्या इतिहासात ज्या ज्या मानवजातींची कर्मप्रेरणा नष्ट झाली त्या त्या जातीसुद्धा नष्ट झाल्या आहेत. कर्मशील असणाऱ्याच जातींची जीवनी-शक्ती अखंड राहिली व त्यांचे अस्तित्व टिकले. प्रत्येक व्यक्तीसमोर कुरुक्षेत्र आहे. संघर्ष, द्वंद्व याशिवाय जीवन नाही. अशा वेळी कर्मप्रेरणा नष्ट झाली तर व्यक्ती कोलमडून पडेल, पण संघर्षाशी झुंज देणारा कधी शोकग्रस्त, निराश होत नाही.

महात्मा बुद्धाच्या जीवनातील एक घटना या संदर्भात खूप बोलकी आहे. एकदा बुद्ध व शिष्य आनंद एका माळरानावरून जात असताना त्यांनी एक कोवळे रोपटे पाहिले. हिरव्यागार पानांनी झाकाळलेले, भरभरून जीवनशक्तीने रसरसलेले व आकाशाकडे झेपावणारे ते रोपटे पाहून बुद्ध म्हणाले की, या रोपट्यात जीवन जगण्याची ऊर्मी आहे, धडपड आहे, ऊन-पावसात संघर्ष करण्याची जिजीवशा आहे. हे रोपटे मोठे होणार....

असे म्हणत बुद्ध पुढे चालले. आनंदने तेवढ्यात ते रोपटे उपटले व फेकून दिले. बुद्ध हसले व म्हणाले, ''ठीक आहे. याची परीक्षा घेण्याची तुझी इच्छा आहे काय?''

तीन-चार आठवड्यांनंतर दोघेजण त्याच रस्त्याने येत असताना बुद्धाने आनंदला ते रोपटे दाखविले. ज्या पडलेल्या अवस्थेत ते होते, त्याच अवस्थेत आपली मुळे जमिनीत त्याने घट्ट रोवली होती. तशाही अवस्थेत हिरव्यागार पानांनी ते लहलहत होते. उन्मळून पडूनसुद्धा संघर्ष करीत होते. त्यामुळे पुन्हा उभारी घेऊन जगले होते. आनंदाने.

म्हणून महात्मा बुद्धांनी आनंदला उपदेश केला की, ज्यांच्यात ही कर्मप्रेरणा, कर्मशील वृत्ती असते त्यांची जीवनी-शक्ती कधीच संपत नाही. कितीही संकटे येवोत, पण ते पुन्हा उभे राहतात.

आजच्या काळातसुद्धा अशी अनेक उदाहरणे आहेत की, ज्यांच्यापासून जीवन जगण्याची प्रेरणा घ्यावी. जगप्रसिद्ध वैज्ञानिक पांगळा स्टिफन एका खुर्चीत बसून जगभर प्रवास करतो, विज्ञानातले नवे नवे शोध लावतो. हेलन किलरसारखी अंध शेवटपर्यंत कार्य करते.

ही अवस्था केवळ महाभारतातल्या अर्जुनाचीच होते असे नाही. गीतेतला अर्जुन हा तुमचा-माझा प्रतिनिधी आहे. किंबहुना अर्जुन हे प्रत्येकाचे स्वतःचे प्रतिबिंब आहे. अर्जुनाने संपूर्ण गीतेत भगवंताला जे प्रश्न विचारले आहेत, ते प्रश्न प्रत्येक सहृदयी, सत्प्रवृत्त, ईश्वरवादी, भक्ताचे प्रश्न आहेत. मोहवशता दूर करण्यासाठी भगवंताने अर्जुनाला निःशंक करून सोडले आहे. अर्जुनाची चंचलता ही त्याच्या विषादास कारणीभूत झाली. विषाद म्हणजे खिन्नता-दुःख; चैतन्याचा अभाव. संपूर्ण पहिल्या अध्यायामध्ये विषाद आहे. त्यामुळे त्याला

विषादयोग म्हटले आहे. भक्तियोग, ज्ञानयोग ह्याप्रमाणे अर्जुनाचा विषाद, मोह हादेखील एक योगच. अर्जुनाने कृष्णापासून काहीही लपवून ठेवले नाही. असत्याचा लवलेशही त्याच्यात नाही. स्वतःचे पतन, कर्तव्यच्युतता त्याने निःसंदिग्धतेने कथन केली. स्खलनशील झाल्यामुळेच कृष्णाला कळवळून हाक मारली आहे. अर्जुनाच्या स्वभावाचे सारे कंगोरे हे तुमच्या-माझ्या जीवनातले वाटणे सहज स्वाभाविक आहे. म्हणूनच अर्जुन आपला प्रतिनिधी.

कारण कुरुक्षेत्र म्हणजे आपले शरीरच! सकाळी जेव्हा जाग येते, तेव्हाच 'कुरू, संघर्षाची सुरुवात होते. केवळ जागृतीतच नव्हे तर निद्रा व स्वप्नामध्येसुद्धा मनुष्यास 'कुरू'शी संधान साधावे लागते.

जीवनात संघर्ष आहेतच. ह्याबाबतीत तुकाराम महाराज म्हणतात,

**रात्रंदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग ।**
**अंतर्बाह्य जग आणि मन ।।१।।**

केवळ बाह्य जगतातच युद्ध-सदृश संघर्षमय परिस्थितीला तोंड द्यावे लागते असे नाही, तर अंतर्मनातील कामक्रोधरूपी विकारांबरोबर सतत झगडावे लागते. अंतर्जगतातील या युद्धासाठी मोठी मानसिक दृढता आणि निर्मल विवेकाची जरुरी असते. कोणत्याही कारणाने मन मोहग्रस्त झाले, दुर्बल झाले, की आपली स्थिती अर्जुनासारखी किंकर्तव्यमूढ होते. पण युद्ध तर आपल्याला जिंकायचे आहे. ह्या कुरुक्षेत्राचे धर्मक्षेत्र बनविणे हेच मानवी जीवनाचे अंतिम साध्य आहे. ह्या कुरुक्षेत्रातील मलिनता व क्लैब्य (मानसिक दुर्बलता) जाऊन त्यात सात्त्विकता, आणि वीरवृत्ती आणणे हीच कृतकृत्यता होय. गीतेचे प्रयोजन हेच.

अर्जुन दुर्बलतेने ग्रस्त आहे, तर दुर्योधनादी दुष्टतेने. स्वजनांबद्दलच्या मोहामुळे अनीतीशी लढणेसुद्धा अर्जुन टाळू इच्छितो. दुर्योधनाचा जीवनादर्शच मुळी अनीती आहे. दोघेही आपापल्या परीने मोहग्रस्त आहेत. गीतेचा उपदेश अशा दोन्ही प्रकारच्या मोहवृत्तींपासून मुक्त करू शकतो.

आज शिक्षण, समाजकारण, राजकारण ही सर्वच क्षेत्रे धर्मक्षेत्राऐवजी 'कुरुक्षेत्रे' होत आहेत. समाजातील 'अर्जुन' निरुत्साही, निष्क्रिय झाले आहेत आणि धृतराष्ट्र व दुर्योधन यांचा गाजावाजा होत आहे. भोगवाद व चंगळवाद हेच जीवनाचे सार झाले आहे. झटपट श्रीमंतीची स्वप्ने पाहणाऱ्यांची संख्या रोज वाढते आहे. त्यामुळे कोणताही विधिनिषेध न बाळगता, नीती-अनीतीची चाड न ठेवता मिळेल त्या मार्गाने पैसा मिळवावा व ऐहिक साधनांचा उपभोग घेत जीवन जगावे हेच ध्येय ठरत आहे. अतिशय सात्त्विक प्रवृत्तीची असलेली माणसेदेखील मोहाला बळी पडतात. विद्यापीठात उच्चपद भूषविणारा एखादा पुत्रप्रेमामुळे मोहवश होऊन मार्कस् वाढविण्यासाठी धडपडतो. आपल्या मुलाला अवैधपणे गुण वाढविताना त्याचा परिणाम मुलाच्या भावी जीवनावर काय होईल ह्याची तमा तो बाळगत नाही. मोठमोठ्या प्रकल्पावरचे सरकारी अधिकारी,



राजकारणातील उच्चपदस्थ, डॉक्टर्स, प्राध्यापक, सत्तालोलुप मंडळी ह्यांची प्रकरणे रकानेच्या रकाने भरून रोज वर्तमानपत्रातून छापून येताहेत. बोफोर्स, हवाला प्रकरण, इ.मध्ये अडकून पडलेली माणसे ही मुळातच दुर्योधनाच्या वृत्तीची असतात, असे नाही. ज्ञानसंपन्न, कर्तृत्ववान, विद्याविभूषित अशा व्यक्तींच्या जीवनात मोहवश होण्यासारखे क्षण येतात. वित्तेषणा, लोकेषणा, दारेषणा ह्यांसारख्या ईषणा अशा वेळी थैमान घालतात. सत्प्रवृत्त मंडळी त्याला बळी पडतात. 'स्वधर्मा'ची विस्मृती होते. तृष्णा, मोह, खोटी प्रतिष्ठा, मोहवशता ह्यांमुळे विवेकभ्रष्ट होऊन जीवन मातीमोल करून घेतात.

समाजाची ही दुरवस्था पाहता कधी नव्हे एवढी आज कृष्णाची गरज भासते आहे. कुरुक्षेत्राचे धर्मक्षेत्र होण्यासाठी आजही कोणत्या अवताराची वाट पाहायची? कृष्ण आजही आहे. गीतारूपी वाङ्मयीन मूर्ती म्हणून तर आहेच. पण प्रत्येकाच्या अंतर्यामातदेखील तो वास करतो आहे. राम-रावण, कौरव-पांडव दोन्हींच्या प्रवृत्ती आपल्यात आत आहेत. परमेश्वराने मनुष्याला बुद्धीची देणगी दिली आहे. विचारांनी बुद्धी बदलते. गीतेचे विचार प्रभावी आहेत. ते विचार भगवंताचे आहेत. मानवी जीवनातला हा कचरा काढून टाकायचा असेल, तर अशा विचारांची पेरणी केली पाहिजे.

गीतेचा पहिला अध्याय हा अर्जुनासारख्या मोहग्रस्त झालेल्या व्यक्तींच्या जीवनातील अवस्थेचे वर्णन करणारा आहे. दैवी गुणांची प्रतिष्ठापना करणे म्हणजे कुरुक्षेत्राचे धर्मक्षेत्र करणे. 'तमसो मा ज्योतिर्गमय' ह्या न्यायाने शाश्वत जीवनमूल्य, विचार, जीवनात आणून 'दुः'च्या जागी 'सु', कौरवांच्या जागी पांडवांची प्रतिष्ठापना करणे, त्यांची संख्या वाढविणे हे आमचे पवित्र कर्तव्यच होय.

ह्या पहिल्या अध्यायाचे हेच महत्त्व. विषाद, दुःख, चंचलता, मोहवशता, अज्ञान, विकारवशता, अस्थिरता, क्षणिक सुखापोटी केलेली आत्मवंचना, बुद्धीचा लोप होऊन भावनेवर आरूढ होऊन घेतलेले आत्मघातकी निर्णय... अशी जी अर्जुनाची अवस्था तीच अवस्था आपल्या सर्वांच्या जीवनात वेगवेगळ्या वळणावर येणारी. अर्जुन जसा मोहमुक्त झाला तसे आपण होणार की नाही हाच प्रश्न आहे. गीता जीवनग्रंथ आहे तो याचसाठी. ज्याच्या जीवनात गीता आली त्याच्या जीवनात अशी हतबल, किंकर्तव्यविमूढ अवस्था होऊन अधःपात होण्याचे कारणच नाही. ते ''स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव'' अशा मानसिक स्थैर्य व दृढतेने जीवन जगतात, त्यांची दृष्टी स्वच्छ राहते आणि जीवन 'तत्'ला समर्पित झालेले असते. गीतेचे प्रज्ञामय तेजस्वी विचार त्यांना 'मोह' अथवा 'भय' यांसारख्या विमूढतेपासून दूर ठेवतात. प्रभूची अनंत करुणा, अनंत शक्ती, अनंत स्फूर्ती त्यांच्याबरोबर असते ना!

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**



# अध्याय दुसरा
# सांख्ययोग

अर्जुनासारखी ऋजुता व सत्यनिष्ठा असेल तरीसुद्धा विषादाचाही योग बनू शकतो. खरे म्हणजे अर्जुनाला भगवंतांनी केवळ निमित्तच बनविले आहे. कोणत्याही युगातील मानवी जीवनात उद्‌भवणारे प्रश्न अर्जुनाने विचारले असल्याने भगवंताला मानवी जीवन कृतार्थ करून सोडणारे जीवन-सिद्धांत ह्या दुसऱ्या अध्यायापासून सांगायचे आहेत. पहिल्या अध्यायात भगवंताचे कोणतेही निवेदन नसल्याने काही जण गीतेची सुरुवात ह्या अध्यायापासूनच मानतात. भगवंत ह्या अध्यायातील दुसऱ्या श्लोकापासून जे जीवन-सिद्धांत, जे गूढ तत्त्वज्ञान सांगत आहेत, ते पहिल्या अध्यायाच्या पार्श्वभूमीवरच. अर्जुनाचा विषाद-रोग दूर करण्यासाठी प्रत्येक अध्यायात यशस्वी जीवनाची गुरुकिल्ली, संजीवनी, बोधामृत, औषध ते देत आहेत. ह्या अध्यायापासूनच गीतेच्या शिकवणीस प्रारंभ होत आहे. संपूर्ण गीतेमध्ये विविध विषयांवर जे तत्त्वज्ञान विस्ताराने मांडले गेले आहे ते सर्व सिद्धांत सूत्रबद्धतेने व कल्पकतेने दुसऱ्या अध्यायात सारभूतरूपात भगवंताने कथन केले आहेत. म्हणून दुसरा अध्याय म्हणजे संक्षिप्त गीताच!

या अध्यायात तीन प्रमुख विषय मांडले गेले आहेत -

१) देहाची नश्वरता आणि आत्म्याचे नित्यत्व

२) स्वधर्म-पालनाची अपरिहार्यता आणि निष्काम कर्माचा सिद्धांत

३) स्थितप्रज्ञ स्थितीची विवेचना

धर्मसंमूढ झालेल्या अर्जुनाची भगवंताकडे शरणागती व भगवंताकडून शिष्यत्वस्वीकार ह्याच गोष्टी तत्त्वज्ञान सांगण्यास कारणीभूत झाल्या आहेत. स्वबांधवांना व परमपूज्य गुरुजनांना न मारता या जगात मला भिक्षान्न खाऊन राहणे अधिक कल्याणप्रद वाटते, ह्याचा पुनरुच्चार करून अर्जुनाने भगवंताकडे आपली विवशता, श्रेय-प्रेयाबद्दलची साशंकता कळकळीने कथन केली आहे.

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः**
**पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे**
**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ।।७।।**



''करुणाव्याप्त दैन्यामुळे स्वभाव नष्ट झालेला, धर्मसंमूढ, किंकर्तव्यमूढ असा मी श्रेयाबद्दल म्हणजे कल्याणकारक मार्गाबद्दल तुला विचारतो आहे. मी आपणास शरण आलो असल्याने व आपले शिष्यत्व स्वीकारल्याने मला उपदेश करावा.''

ह्यामुळे अर्जुनाचे शिष्यत्व हेच भगवंताच्या तात्त्विक ऊहापोहाचे कारण. केवळ त्याने प्रश्न विचारले म्हणून नव्हे. भक्ती किंवा अध्यात्ममार्गात संपूर्ण शरणागती, गुरु-शिष्य नाते ह्याला अनन्यसाधारण महत्त्व आहे. किंबहुना व्यावहारिक जीवनातसुद्धा ह्या गुणांचा अभाव असल्यास उदात्त, उत्तुंग, भव्य, दिव्य काही गोष्टी प्राप्त करणे फार अवघड... बहुतेक असंभवच होते.

या अध्यायात अर्जुनाने आपली विवशता पुन्हा एकदा कथन केली. ह्याचे कारण भगवंताने कठोर शब्दांत केलेली त्याची निर्भर्त्सना... कानउघाडणी.

भगवंत म्हणतात -

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ।।२।।**
**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ।।३।।**

''अरे अर्जुना, तुला अशा कठीण समयी दुष्कीर्तीला कारणीभूत होणारे, स्वर्गप्राप्तीला हानीकारक व श्रेष्ठांनी केव्हाही न आचरलेले हे अज्ञान कोठून प्राप्त झाले? अर्जुना, अशा षंढपणाला प्राप्त होऊ नकोस. ही दुर्बलता तुझ्या ठिकाणी योग्य दिसत नाही. क्षुद्र अशी हृदयाची दुर्बलता सोडून ऊठ!''

हे दोन्ही श्लोक महत्त्वाचेच, पण त्यातही तिसरा श्लोक जीवनाचा अत्यंत महत्त्वाचा सिद्धांत समजावून सांगणारा. म्हणूनच स्वामी विवेकानंदांना ह्या श्लोकाचे एवढे महत्त्व जाणवले की त्यांनी आपल्या शिष्यांना उपदेश देताना सांगितले, ''संपूर्ण ७०० श्लोकांची गीता अभ्यासावयास तुम्हांला वेळ मिळाला नाही, तरी हा एकच श्लोक पठन करावा. हा एकच श्लोक जरी वाचला तरी सारी गीता वाचण्याचे पुण्य तुमच्या पदरी पडेल. कारण ह्या एकाच श्लोकात गीतेचा समग्र संदेश साठवलेला आहे.''

''**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ...**' अशा शब्दांनी अर्जुनाला युद्धाला प्रेरित करीत असताना भगवंतांना अर्जुनाच्या मानसिक स्थितीची कारण-मीमांसा पूर्ण ज्ञात आहे. अर्जुनाची शुद्ध प्रज्ञामय सात्त्विकता लोप पावली होती. अर्जुनाच्या अनिच्छेच्या मुळाशी मोहमय तमोगुणाचा वाढलेला प्रभाव होता. अर्जुनाच्या ठायी जे दयेचे रूप प्राप्त झाले होते त्याचे कारण हा तमोरूपी मोहच. स्वधर्म-पालनासाठी अर्जुनाची दृढता लुप्त झाली होती. त्याची केविलवाणी दशा झाली होती. हा मोह

घालवून देण्यासाठी भगवंत पुढे म्हणतात -

**''नैतत्त्वय्युपपद्यते''** - हे तुला शोभत नाही!''

अर्जुनाची जी ही अवस्था झाली, त्याचे समर्थन अर्जुनाने कसे केले, याचे विश्लेषण करणे इथे जरुरीचे आहे. वास्तविक कौरव-पांडव हे सख्खे चुलत भाऊ. म्हणून त्यांच्यातील युद्ध म्हणजे संपूर्ण कुलनाश. शिवाय युद्ध झाल्यास आपल्या प्राणापेक्षा प्रिय पितामह व गुरूंना मारून टाकण्याचा प्रसंग येणार होता. असा ग्रह करून घेतल्यामुळे त्याने कृष्णाला - ''न योत्स्ये'' - ''मी युद्ध करणार नाही'' असे साफ सांगितले व हातातील धनुष्यबाण खाली टाकले. निःशस्त्र स्थितीत कौरवांनी आपल्याला मारले तरी बेहत्तर अशी त्याची मनःस्थिती झाली.

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ।।१.४६।।**

एक बाब सोडली तर अर्जुनाचे वरील तर्क सुसंगत वाटतात. ती अशी की जर हे युद्ध केले नाही तर अधर्माचा विजय होईल. अधर्माचा पाडाव झालाच पाहिजे आणि त्यासाठी कोणतीही किंमत द्यावी लागली तरी ती देणे हाच खरा धर्म होय. स्वजनांच्या मोहामुळे या मोठ्या सत्याकडे अर्जुनाची डोळेझाक झाली. तो विसरला की, स्वकुलनाशापेक्षा धर्मरक्षण हे समाजासाठी अधिक महत्त्वाचे आहे आणि एक क्षत्रिय म्हणून **''धर्म्यं संग्रामं''** (गीता २.३३) धर्मयुद्ध करणे हे पाप नसून ते न करणे हेच पाप आहे. मृत्यूच्या संबंधित त्याचा भावुकपणा आत्म्याचे अमरत्व आणि देहाची नश्वरता यांच्या संदर्भात निरर्थक होता. शेवटी गीतेच्या उपदेशाने त्याच्या मनातील सर्व शंका दूर झाल्या आणि नंतर तो **''करिष्ये वचनं तव''** (''तुमच्या म्हणण्याप्रमाणे करतो'') म्हणून ठामपणे धर्मयुद्धाला सिद्ध झाला.

माणसाचे संपूर्ण जीवन असेच अज्ञान आणि दुर्बलता ह्यांनी ग्रासलेले असते. जगातल्या सर्व दुःखाचे मूळ यामध्येच आहे. ह्याच्याविरुद्ध जर अंतःकरणात प्रज्ञा म्हणजे यथार्थ तत्त्वज्ञान आणि सबलता निर्माण झाली तर सारा विषाद, रोग, पाप, शोक, दुःख हे मिटून जातील. म्हणूनच स्वामी विवेकानंदांनी साऱ्या जगात ''क्लैब्यं मा..'' गीतेच्या ह्या संदेशाचा प्रचार केला आहे. ते म्हणतात - ''हे मानवा! 'तू' उच्च स्वराने सांग - तुझ्या ठायी पापाचा लेशही नाही. तुझ्या ठायी दुःखाचा कणही नाही. तू सर्व शक्तीचे भांडार आहेस. ऊठ! जागा हो! आणि स्वतःचे दिव्य स्वरूप प्रकट कर!'' स्वामीजींचा हा संदेश आज शंभर वर्षांनंतरही सर्वांना उद्बोधक आहे आणि चिरकाल असाच राहील. ''दुर्बलता हाच मृत्यू व बल हेच जीवन.'' हे रामकृष्ण संघाचे तर घोषवाक्यच आहे; व्यक्ती असो अथवा समष्टी किंवा राष्ट्र असो, अज्ञान व दुर्बलता जर जीवनातून गेली



तर निश्चितच तेजस्विता येईल. गीतेच्या विचारांच्या अनुशीलनाची याचसाठी गरज आहे.

'मी युद्ध करणार नाही' असे वीरपुरुषाला न शोभणारे वक्तव्य केल्यानंतर श्रीकृष्णाने अर्जुनाची निर्भर्त्सना करावयास सुरुवात केली. पांडव-कौरव ह्यातील युद्ध हे दोन विचारधारांतील संघर्ष होता. सत् व असत् यातील संघर्षात माघार घेण्याने केवळ अपकीर्तीच नव्हे तर अर्जुनाला स्वर्गप्राप्तीलाही मुकावे लागेल, असे भगवंताने सांगितले.

जीवनातील संघर्षाला जे समर्थपणे हिमतीने सामोरे जातात त्यांच्यासाठी स्वर्ग आहे. निराश होऊन युद्धातून पळ काढणाऱ्यांसाठी नाही. चौथ्या श्लोकातून भगवंताने अर्जुनाचे निमित्त करून अखिल मानवजातीला उन्नत जीवन जगण्याचा मंत्र इथे सांगितला आहे. जीवनात संघर्ष अपरिहार्य आहे. बाहेरील संघर्षाबरोबर अंतःकरणातील, संकल्प-विकल्पाचेही द्वंद्व आहे. अंतर्बाह्य युद्ध अटळ आहे. जोपर्यंत श्वास आहे तोपर्यंत या ना त्या स्वरूपात मानवी जीवनात संघर्ष राहणारच. अशा वेळी निराश न होता धैर्याने त्यास तोंड दिले पाहिजे. प्रत्येक जीवात भगवंताने अशी शक्ती देऊन ठेवली आहे. अव्यक्त स्वरूपात असलेल्या जीवन-ऊर्जेला जागे केले पाहिजे. दुबळेपणा टाकून जो प्रतिकाराला सज्ज होतो तो पुरुषार्थी ठरतो. त्याचीच आतील ऊर्जाशक्ती जागृत होते. अशाच लोकांना इतिहासात स्थान मिळते.

रावणाची शक्ती प्रचंड होती. दरबारात सर्वच जण खुषमस्करे होते. कोणीही त्याच्या चुका सांगण्याचे धैर्य दाखवत नव्हता, पण बिभीषण याला अपवाद ठरला. रावणाच्या हितासाठी त्याने सत्य सांगितले. रावणाच्या उन्मत्त स्वभावामुळे कुळाचा नाश तर होईलच पण लंकासुद्धा नष्ट होईल याचा इशारा त्याने दिला. रावणाला हे सहन झाले नाही. भरदरबारात रावणाने आपल्या भावाला लाथ मारली व सभेबाहेर हाकलून लावले.

असेच धैर्य दुर्योधनाच्या एका भावाने - विकर्णाने दाखविले. दुर्योधनाला त्याने खडसावले की, ''दुर्योधना, तू विनाशाची बीजे पेरत आहेस. यातून सर्वांचाच नाश होईल एवढे ध्यानात ठेव.'' विकर्णाचा उपमर्द झाला, पण सत्य सांगण्यासाठी त्याने कशाचीही तमा बाळगली नाही.

रामायणातसुद्धा असेच घडले. लंकेला पाठविण्यासाठी हनुमंताला जेव्हा सांगितले त्या वेळी हनुमानाला स्वतःच्या सामर्थ्याची जाणीव नव्हती. सर्वांनी त्याला जागे करण्यासाठी प्रशंसा करावयास सुरुवात केली, ''हे हनुमाना, अग्नीने तुला तेज दिले आहे. देवी-देवतांनी तुला प्रचंड शक्ती दिली आहे. वायूची गती, पाण्याची शीतलता व सूर्याचे तेज तुझ्यात आहे. तू आपल्या स्वरूपाला

ओळख. तुझ्यातल्या आंतरिक शक्तींना जागे कर." हनुमानावर याचा प्रभाव पडला. स्वतःची ओळख पटली व नंतर लंकेला त्याने प्रयाण केले.

भगवंताने अशी ऊर्जा प्रत्येकाला दिली आहे. संघर्षात ती सुप्त शक्ती जागी होते. कोणीतरी त्या शक्तीला जागे करते. पण लढले पाहिजे. म्हणून कठोपनिषदाचासुद्धा संदेश आहे...

**"उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान् निबोधत ।"**

उठा, जागे व्हा... जो जागृत आहे त्यालाच सर्वकाही प्राप्त होते. जीवन संग्रामात जो लढतो तो निराशेच्या, दुःखाच्या खाईत पडत नाही.

वरील श्लोकातून भगवंत अर्जुनाचा स्वाभिमान जागृत करण्याचा प्रयत्न करीत आहेत. हृदयातील क्षुद्र दुर्बलता काढून टाकून युद्धासाठी तयार हो म्हणून उपदेश करीत आहेत.

"न योत्स्ये" - असा निर्णय घेतलेल्या अर्जुनाची धर्मसंमूढ अवस्था दूर करण्यासाठी श्रीकृष्णांनी त्याला यथार्थ तत्त्वज्ञान सांगण्यास सुरुवात केली. ते म्हणतात -

**"न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ।।१२।।**
**देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ।।१३।।**

"अर्जुना, मी, तू, हे सारे राजेलोक पूर्वी नव्हते असे नाही किंवा यापुढे असणार नाहीत असे नाही. अरे, ज्याप्रमाणे देहात असणाऱ्या जीवात्म्याला कुमारावस्था, युवावस्था, वृद्धावस्था ह्या प्राप्त होतात त्याचप्रमाणे (मृत्यूनंतरची) देहांतरप्राप्तीही होते. त्याबद्दल धीर, प्रज्ञावंत व्यक्ती मोहित, शोकाकुल होत नाहीत."

देह अनित्य आहे. मरण ही देहाची प्रकृती आहे. हा देह क्षणाक्षणाला बदलतो. म्हणजे प्रत्येक क्षणी तो मरत असतो. विनाश, मृत्यू हा अटळ असतो. आकार व रूपाने सतत बदलणारा, पंचमहाभूतांनी बनलेला व त्यातच शेवटी विलीन होणारा असा विकारी, क्षणभंगुर देह वस्त्रासारखाच आहे. वस्त्राप्रमाणेच तो बदलायचा असतो. वरील श्लोकांवर भाष्य करताना ज्ञानेश्वर माऊली म्हणते-

**हे उपजे आणि नाशे । ते मायावशे दिसे ।**
**येऱ्हवी तत्त्वता वस्तु जे असे । ते अविनाशचि।**
**जैसे पवने तोय हलविले । आणि तरंगाकार जाहले ।**
**तरी कवण के जन्मलें । म्हणो ये तेथ ।।१०५-१०६।।**



"भ्रांतीला वश झाल्यामुळेच जन्म व मृत्यू हे अनुभवास येतात. एरवी वास्तविक वस्तू (आत्मा) जो आहे तो अविनाशीच. जसे वाऱ्याने पाणी हालविले; त्यामुळे त्याला तरंगाचे रूप आले. तर या ठिकाणी कोणाला, कोणी, कोठे जन्म दिला अथवा आला, असे म्हणता येईल?"

चैतन्याच्या ठिकाणी असे अनेक देह येतात व जातात असे जो जाणतो, त्याला भ्रांतिजन्य दुःख कधीही होत नाही. जो देह जन्माला येताच त्याचा मृत्यू ठरलेला असतो अशा देहाबद्दल किती ममत्व ठेवायचे? देहाचे हे अनित्यत्व विसरणे हेच देहासक्तीला कारणीभूत होते. पण अशा देहालासुद्धा मनुष्य आपल्या सत्कर्माने कोठल्या कोठे नेऊ शकतो.

"नर करणी करे तो नरका नारायण हो जाये," ह्या उक्तीनुसार देह हे परमेश्वरसेवेचे साधन आहे. आत्मोन्नतीचे कारण आहे. केवळ मनुष्यदेहालाच ही संधी प्राप्त झाली आहे. संत-महात्म्यांनी ह्या नश्वर देहाचे उगाच लाड केले नाहीत. संतांना ह्या विकारी देहाच्या नश्वरतेची जाणीव होती. सच्चिदानंद प्राप्त करण्याचे ते एक ईश्वरीय साधन आहे, असे समजूनच ते कृतार्थ जीवन जगले. सॉक्रेटिसला विष देत असताना त्याचा आनंदी चेहरा पाहून तुरुंगाधिकाऱ्याने त्याचे रहस्य विचारले. तेव्हा सॉक्रेटिसने उत्तर दिले - "मरणारा कोण? मी तर मुक्त आत्मा, अविनाशी चैतन्य आहे." परमहंस रामकृष्णांना दाढेचा कॅन्सर झाला होता. वेदनेचा मागमूसही त्यांच्या चेहऱ्यावर दिसत नव्हता. चेष्टेने ते म्हणायचे की, लोक मृत्यूच्या दाढेत जावयास घाबरतात. पण मृत्यू माझ्या दाढेत आहे. अशीच अवस्था परम साधक रमणमहर्षींची होती. पण ते सुद्धा सदैव प्रसन्न, शांतचित्त असत. महात्मा गांधींना मृत्यूच्या क्षणीसुद्धा 'हे राम' हेच शब्द आठवले. शांत, धीरगंभीर स्थितीत त्यांनी मृत्यू स्वीकारला. ज्यांनी ज्यांनी देहाचे हे तत्त्वज्ञान प्रत्यक्ष अनुभवले, त्याची प्रचीती घेतली, त्यांचे जन्म कृतार्थ झाले आहेत. मृत्यूच्या भयापासून ते कधीच कंपित झाले नाहीत. ज्ञानेश्वर माऊलींनी तर बाविसाव्या वर्षी प्रसन्नचित्ताने समाधी घेतली.

पण सामान्य पुरुष मृत्यूच्या नुसत्या विचाराने भयग्रस्त होतो; कंपित होतो. सततच्या देहासक्तीमुळे हा देह सोडण्याचा विचार त्याच्या अपार दुःखाला कारणीभूत होतो. तो स्वतःच्या देहावर तरी प्रेम करतोच पण इतर देहांवरील आसक्ती, प्रेम, माया, ममता हे सर्व त्याच्या दुःखाला कारणीभूत ठरते. हा देह मी भाड्याने घेतलेला आहे. त्याची सर्वस्वी मालकी माझी नाही, हे तो विसरतोच. महिना संपल्याबरोबर जसे भाडेकरूकडून आपण भाडे वसूल करतो, तसा हा देह ज्याच्याकडून घेतला आहे त्याच्याविषयीची कृतज्ञता बाळगून त्याला

आवडणाऱ्या रूपात मला भाडे द्यावयाचे आहे, हे तो पूर्णपणे विसरून जातो. हा देह माझाच आहे, ह्या भ्रांत कल्पनेने त्याला जीवनाची कृतार्थता कशात आहे, ह्या मातीमोल असणाऱ्या व मातीतच जाणाऱ्या देहाचे सोने कसे करावे हेही समजत नाही. आहार, निद्रा, भय, मैथुन ह्यातच पशुवत जगणाऱ्या माणसाला गीतेने जागे करण्याचा प्रयत्न केला आहे. देहात्मता सोडून आत्मविकास, दैवी जीवन व कृतार्थता अनुभविण्यासाठीच गीतेचा संदेश आहे.

देहाची नश्वरता सांगून झाल्यानंतर आता भगवंत आत्म्याची नित्यता विस्तारपूर्वक सांगत आहेत. ह्या अविनाशी तत्त्वाचा बोध करून घेऊन स्वधर्म म्हणून युद्धास तयार राहण्याबद्दल अर्जुनाला जागृत करीत आहेत. ह्या अविनाशी, नित्य आत्म्याबद्दल श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात-

**या उपाधीमाजी गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।**
**ते तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती ।।१२६।।**

या देहादी प्रपंचामध्ये सर्वत्र चैतन्य गुप्त रूपाने आहे. तत्त्व जाणणारे संत हे ओळखून त्याचेच ग्रहण करतात.

**आणि शरीरजात आघवे । हे नाशवंत स्वभावे ।**
**म्हणोनि तुवां झुंजावे । पंडुकुमरा ।।१३६।।**

**न जायते म्रियते वा कदाचिन् नायं भूत्वा भविता वा न भूयः ।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ।।२०।।**

''हा आत्मा कधी जन्म पावत नाही; मृत्यू पावत नाही. जन्मरहित, नित्य, अनादी, अक्षय आहे. शरीराचा नाश झाला असता याचा नाश होत नाही. अशा आत्म्याला कोणीही पुरुष मारणार तरी कसा?''

जसे आकाश घटात घटाच्या आकाराचे झालेले दिसते पण तो घट मोडल्यावर ते आकाश सहजच आपल्या मूळ स्वरूपात विलीन होते, त्याप्रमाणे ह्या घटरूपी शरीराचा नाश झाला तरी त्यातील चैतन्यतत्त्वाचा नाश होत नाही. म्हणूनच भगवंत पुढे म्हणतात -

**वासांसि जीर्णानि यथा विहाय**
**नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णा -**
**न्यन्यानि संयाति नवानि देही ।।२२।।**

ज्याप्रमाणे पुरुष जीर्ण वस्त्रे टाकून देऊन दुसरी नवीन वस्त्रे धारण करतो, त्याप्रमाणे आत्मा जीर्ण शरीरे टाकून देऊन दुसरी नवीन प्राप्त करून घेतो. अशा आत्म्याला शस्त्रे तोडीत नाहीत, अग्नी जाळत नाही, पाणी भिजवीत नाही व वारा सुकवीत नाही. हा अव्यक्त, अचिंत्य, अविकारी आहे. म्हणून भगवंतांना



पुनःपुन्हा अर्जुनाला त्याचा शोक किती व्यर्थ आहे व तो करणे कसे योग्य नाही हेच सांगावयाचे आहे.

**अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।**
**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ।।२५।।**

''कोणत्याही इंद्रियाला तो कळत नाही. मन त्याची कल्पना करू शकत नाही, त्याच्यात कोणताही बदल होत नाही असे तत्त्वज्ञानी लोक सांगतात. म्हणून त्याचे हे स्वरूप लक्षात घेऊन तू शोक करू नकोस.''

आत्मा सत् आहे, नित्य आहे. पण जे असत् आहे ते अनित्य आहे. त्याचा नाश अटळ आहे. आत्मा आज आहे, पूर्वीही होता व पुढेही राहणार आहे. शरीर मात्र नष्ट होणार. ज्या शरीरातून तो आत्मा निघून जातो तो पुन्हा दुसरे शरीर धारण करतो. पुन्हा नवीन नाती, नवीन जीवन. देहरूपाने कोणीही चिरंतन राहत नाही हे सत्य आहे.

युधिष्ठिराने यक्षाला उत्तर देताना हेच सत्य सांगितले. जगातील सर्वांत मोठे आश्चर्य सांगताना युधिष्ठिर म्हणाला, ''प्रत्येक जण या जगातून निघून जाणार आहे. पण प्रत्येकाला वाटते की, मी त्यात अजून नाही. मला जावे लागेल हे मानावयास तयार न होणे यापेक्षा दुसरे आश्चर्य कोणते?''

अथर्ववेदात एक वेगळाच उपदेश आहे. या जगात कुणाची हुकुमत चालते? असा प्रश्न उपस्थित करून त्याचे उत्तर दिले आहे-

**''मृत्यूरीशे विपदा मृत्युरीशे चतुस्पदाय.''**

या जगावर मृत्यूचे राज्य चालते. दोन पाय असलेल्या मानवजातीवर व चार पाय असलेल्या प्राण्यांवरसुद्धा मृत्यूचीच सत्ता चालते.

संत कबीराने मृत्यूनंतर येणाऱ्या अवस्थेचे किती मार्मिक वर्णन केले आहे!

**''चलती बरिया हमको उड़ावे चदरिया ।''**

मृत्यूनंतर कुटुंबीयांनी काय केले? एक कफन, अडीच वार कापड तेवढे शरीरावर पांघरले. पण त्यापूर्वी शरीरावरील सर्व दागिने उतरविले.

म्हणून मृत्यूनंतर एकट्यालाच जावे लागते. फक्त उत्तम कर्म, पुण्य किंवा पापच बरोबर जाते.

या जगात जेव्हा प्रथम येतो त्या वेळी पहिला श्वास घेतो व या जगातून जाताना शेवटचे काम करतो ते म्हणजे शेवटचा श्वास घेण्याचे. श्वास घेणे हे जीवनाचे प्रतीक तर श्वास सोडणे, शेवटचा श्वास घेणे म्हणजे मृत्यू. जितके श्वास तेवढेच जीवन.

शरीर संपते पण आत्म्याचा दुसरा प्रवास सुरू होतो. म्हणून सर्व उपनिषदांनी, वेदांनी उपदेश केला आहे की, आत्म्याची शोभा वाढेल असे आचरण करा.

केवळ शरीराला नव्हे तर आत्म्याला सजवा. शरीराच्या सुखासाठी सर्व धडपड चाललेली असते. आत्मलाभासाठीसुद्धा काही साधना करणे म्हणजे पुनर्जन्माची किंवा मृत्यूनंतरच्या प्रवासाची तयारी करणे आहे. अमेरिका किंवा कोणत्याही दुसऱ्या देशाला जाताना त्या त्या देशाची करन्सी घ्यावी लागते. तसेच परलोकाला जाताना तेथली करन्सी घ्यावी लागते. या जन्मात मिळविलेले पुण्य व सत्कर्म हीच ती करन्सी. तेच आपल्याबरोबर येते. आत्म्याला सजविण्यासाठी आत्मचिंतनाची गरज आहे. मी कोण? मी कोठून आलो? माझे खरे माता-पिता कोण? मी मृत्यूनंतर कोठे जाणार? कोणत्या गोष्टी चिरंतन राहणार? जीवनाची कृतार्थता कशात आहे?... अशा प्रश्नांनी आपल्या स्वरूपाची ओळख व्हायला सुरुवात होईल. ती साधना म्हणजेच ज्ञानसाधना! ज्ञान म्हणजे सांख्य. म्हणून दुसऱ्या अध्यायाचे नाव सांख्य आहे. इथे सांख्य म्हणजे कपिलमुनींचे सांख्य-दर्शन अभिप्रेत नाही. ज्ञान म्हणजे प्रकाश. अंधारातून प्रकाशाकडे जाण्याचा हा मार्ग आहे. स्वतःला जाणण्याचा अशुभापासून संरक्षण करण्याचा हा मार्ग आहे. विषादापासून आनंदाकडे नेणारा हा राजमार्ग आहे.

हा जीवलोक जन्म-मृत्यूच्या आधीन आहे. जन्मलेल्याला मृत्यू व मृत्यू पावलेल्याला जन्म निःसंशय आहे.

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्यच ।**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ।।२७।।**

ह्यावर माऊलींचे भाष्यदेखील खूप उद्‌बोधक असे आहे. ते म्हणतात -

**उपजे ते नाशे । नाशले पुनरपि दिसे ।**
**हे घटिकायंत्र तैसे । परिभ्रमे गा ।।**
**ना तरी उदो अस्तु आपैसे । अखंडित होत जात जैसे ।**
**हे जन्ममरण तैसे । अनिवार जगी ।।१५९-१६०।।**

जे उत्पन्न होते ते नाश पावते व नाश पावलेले पुन्हा दिसते. अर्जुना, रहाटगाडग्यासारखा असा हा क्रम अखंड चालतो. अथवा उदय व अस्त जसे आपोआप अखंडपणे होत जातात त्याप्रमाणे जन्म-मृत्यू हे जगात चुकविता येणारे नाहीत.

''न त्वं शोचितुमर्हसि'' हे पुनःपुन्हा सांगण्यासाठी जन्म-मृत्यूचे रहस्य विशद करावे लागले. सर्व जीव जन्माच्या आधी अव्यक्त, निराकार असतात. जन्मल्यानंतर आकार प्राप्त होतो. मृत्यूनंतर पुन्हा आपल्या मूळच्या अवस्थेला प्राप्त होतात. हे मध्यंतरी जे व्यक्त रूप दिसते, ते निद्रिताच्या स्वप्नाप्रमाणे नाही का? सत्स्वरूप चैतन्याच्या ठिकाणी मायेमुळे हा जगदाकार दिसतो. जसे पाण्यावर लाटा किंवा सोन्याचे दागिने. सर्वांच्या देहामध्ये निर्विकार असे जे चैतन्य आहे,



त्याचा वेध घेणे, त्यास जाणून घेणे हेच श्रेय! असे हे विश्वव्यापी चैतन्य सर्व देहांत व सर्वत्र असल्याने, अर्जुनाने हे समजून घेऊन कोणत्याही प्राण्याबद्दल शोक करू नये, असे भगवंत प्रतिपादन करतात.

देह व आत्मा ह्यांचे स्वरूप कथन केल्यानंतर आता स्वधर्माचा विचार पुढे मांडला आहे. स्वधर्म म्हणजे जे नीतिनियमांना अनुकूल आहे व त्याचबरोबर आपल्या प्रकृतीला, स्वभावाला अनुसरून आहे तो स्वधर्म. स्वधर्म जन्मावरून नाही, तर तो गुणकर्मांवरूनच ठरावा. दुसऱ्या अध्यायात स्वधर्मावर बरेच भाष्य आहे. हाच विषय पुन्हा विस्ताराने तिसऱ्या, अठराव्या अध्यायात मांडला आहे. पण या अध्यायात सूत्ररूपाने अर्जुनाला आपल्या स्वधर्माची, महत्त्वाची जाणीव करून दिली आहे. अर्जुन गुणकर्मावरून क्षत्रिय आहे. क्षात्रधर्म त्याचा स्वधर्म आहे. वेदकाली धर्म हा यज्ञस्वरूप होता. ज्ञानेश्वरांनी स्वधर्म हाच यज्ञ आहे, असे प्रतिपादले आहे. विहित कर्म हा स्वधर्माला पर्यायी शब्द.

**''आगा जेया जे विहित । ते ईश्वराचे मनोगत ।**
**म्हणौनि केलिया निभ्रांत । परितोखु पावे ।।''**

असे सांगून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात की, स्वधर्माप्रमाणेच आचरण करूनच ईश्वराची खरी पूजा करावी. स्वधर्माचा विचार करता धर्म्य युद्धापेक्षा मोठे क्षत्रियाला दुसरे काही कर्तव्य नाही.

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ।**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ।।३१।।**

या उलट, स्वधर्म टाकणारा पापाला कारणीभूत होईलच पण अपकीर्तीचा डाग कल्पांतापर्यंतही जाणार नाही. आणि सज्जनांना अपकीर्ती ही मरणापेक्षा जास्त वाईट, दुःखकारक आहे. ही वस्तुस्थिती अर्जुनाला सांगून झाल्यानंतर भगवंतांनी, कर्मबंधनातून मुक्त होण्याचा मार्ग म्हणजे निष्काम कर्मयोगाचे रहस्य कथन करण्यास सुरुवात केली आहे. ''निष्काम कर्म'' हा गीतेचा गाभा आहे. अनासक्त कर्म करण्याची म्हणजेच निष्काम कर्मयोगातील बुद्धी ज्याला साधली त्याला कर्मबंध मुळीच बाधत नाही. शिवाय संसाराचे, लौकिक यशापयशाचे भय त्याला बाधत नाही. अशा निश्चयात्मक बुद्धीने 'अहं' सोडून कर्म करण्याचा उपदेश भगवंतांनी येथे केला आहे. म्हणून ते म्हणतात -

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि।।४७।।**

कर्म करण्यापुरताच आपला अधिकार आहे. फलावर आपला अधिकार आहे, असे कधीच समजू नये. आपण जेव्हा एखादे कार्य करतो, तेव्हा त्याच्या फलावर (परिणामावर) केवळ आपल्या प्रयत्नांचाच प्रभाव असत नाही, इतर

अनेक शक्तींचाही त्यावर प्रभाव पडत असतो. म्हणून आपल्याला जसे हवे, तसेच फळ मिळेल, असे निश्चित नाही. म्हणून कर्म करताना मनात लक्ष्यप्राप्तीचे उद्दिष्ट जरूर ठेवावे, त्याच्याविषयी पूर्ण समर्पण ठेवावे, पण लोभ किंवा आसक्ती अजिबात ठेवू नये. म्हणजे कर्म करण्याचा आपला हेतू कर्मफलाचा लोभ नव्हे तर कर्तव्याची भावना असावी. (**''यज्ञायाचरतः कर्म'' - गीता ४.२३**) मनाच्या शुद्धीसाठीदेखील (**''आत्मशुद्धये'' - गीता ५.११**) हे आवश्यक आहे. कारण की असे केल्यामुळे 'कर्मबंध' म्हणजे कर्मजनित पाप, पुण्य व आसक्तीचे बंधन मनावर राहत नाही. याप्रकारे हा निष्काम कर्मयोग मुक्तीचेही साधन बनतो. (**''जन्मबंधविनिर्मुक्ताः'' - गीता २.५१**). कर्म न करण्याविषयीची मानसिक अवस्थाही कधीच होऊ देऊ नये, कारण ती तामसी स्थिती होय.

आणि हे कर्म करतेवेळी योगयुक्त राहून केले पाहिजे.

**योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनंजय ।**
**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ।।४८।।**

चित्ताची समता हाच योग आणि हा योगच कर्मातील कौशल्य! या योगात मन व बुद्धी ह्यांचे ऐक्य असते.

**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।**
**तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ।।५०।।**

''हे धनंजया! फळाची अभिलाषा सोडून कर्मयोगात ठाम राहून काम कर. कामात यश मिळो अगर अपयश मिळो, मनोवृत्ती स्थिर ठेव. अशी समबुद्धी ठेवणे म्हणजेच योग होय.'' ।।४८।।

''समबुद्धीने कामे करणाऱ्या माणसाला पाप-पुण्य लागत नाही. म्हणून तू हा योग आत्मसात कर. बरे किंवा वाईट कोणतेही कर्म होत असताना समचित्त असणे हेच कर्मातील कौशल्य आहे.'' ।।५०।।

अशा योगस्थितीत दृढ होऊन राहण्याचा उपदेश भगवंतांनी अर्जुनाला केला.

आई आपल्या मुलाला मोठे करते, लालन-पोषण करते, प्रेम, वात्सल्य देऊन खस्ता काढते. असे करीत असताना जर मनात कामना असतील तर ती कर्मबंधनात सापडते. कामना पूर्ण झाल्या नाहीत तर दुःखी होते. पण अनासक्त राहून केवळ कर्तव्यबुद्धीने समचित्त राहून मुलांना वाढविणाऱ्या माता या आदर्श माता होत.

रामायणातील सुमित्रा-मातेचे उदाहरण याचा एक आदर्श नमुना आहे. राम वनवासाला जाताना लक्ष्मणही त्याच्याबरोबर जाणार होता. जाण्यापूर्वी आपल्या सुमित्रामातेला भेटावयास तो आला. आईने लहानपणापासून उत्तम संस्कार केले



होतेच. याहीवेळी आपल्या प्रिय पुत्राला तिने उपदेश केला...

**रामं दशरथं विद्धि मां विद्धि जनकात्मजाम ।**
**अयोध्या अट्टविम् विद्धि गच्छतात् यथा सुखम् ।।**

''हे लक्ष्मणा! जर तुला वनवासात असताना पित्याची आठवण आली तर रामाच्या रूपात पित्याची आठवण कर. आईची आठवण आली तर सीतेमध्ये तिचे रूप बघ व जर अयोध्येची आठवण आली तर वनात फुललेल्या सुंदर वनश्रीमध्ये अयोध्या पाहा. पण काही झाले तरी कर्तव्य आणि सेवा करण्यामध्ये जरासुद्धा कसूर करू नको. अनासक्त राहून कर्तव्यबुद्धीने राहणारी दुसरी आदर्श माता म्हणजे सुनीतीमाता! तिने आपला पुत्र ध्रुव यास असेच समजावले. आपल्या लौकिक पित्यापेक्षा विश्वपित्याच्या मांडीवर जाऊन बसण्याचा सल्ला तिने दिला. स्वराज्याचे रक्षण करण्यासाठी प्राणाचीसुद्धा आहुती देण्याचा उपदेश शिवाजी महाराजांना त्यांच्या आईने दिला.

संसारात आसक्ती ठेवली की दुःख आलेच! त्यापाठोपाठ बंधनही. पण समजून उमजून जाणीवपूर्वक उपेक्षा ठेवली, की अनासक्ती येते. सुखदुःखात मनाचा समतोल ठेवण्यासाठी ही अनासक्ती उपयोगी पडते. जसे रस्त्याने जाताना पडलेला कचरा पाहून त्याच्याकडे उपेक्षेने पाहतो त्यामुळे तो कचरा नंतर स्मरणातही राहत नाही. पण आसक्ती ठेवून पाहिलेली एखादी वस्तू केवळ मोहच पाडत नाही तर ती पुनःपुन्हा स्मरणात येते व दुःखाला कारणीभूत होते. एखाद्याने केलेला अपमान, दिलेली शिवी किंवा केलेली निंदा पुनःपुन्हा स्मरणात येऊन चित्तात द्वेष-मत्सर, राग, लोभ यांचा कहर निर्माण करते. हा सारा प्रपंचच आसक्तीचा आहे. हा प्रपंच मनातही आहे व मनाबाहेरही. एकवेळ बाहेरचा प्रपंच संपेल, पण अंतःकरणातल्या प्रपंचाचे काय? एकांतात जरी गेले तरी तो प्रपंच सतावतच राहतो. वर्षानुवर्षे अंतःकरणातल्या ह्या वृत्ती, ते संस्कार, त्या स्मृती, ते विक्षेप, त्या गाठी, तो अहं वेळोवेळी पिडा देत असतो.

म्हणून योगस्थ राहून, अनासक्त वृत्तीने कर्म करण्याचा उपदेश भगवंताने वरील श्लोकातून केला आहे.

ह्या श्लोकावरील ज्ञानेश्वरांचे निरूपण खूप प्रभावी झाले आहे. ते म्हणतात-

**''अर्जुना समत्व चित्ताचे । तेचि सार जाण योगाचे ।**
**जेथ मना आणि बुद्धीचे । ऐक्य आथी ।।२७३।।**
**जे बुद्धियोगा योजिले । तेचि पारंगत जाहले ।**
**इहि उभयसंबंधी सांडिले । पापपुण्यी ।।२७७।।**

'समत्वं योग उच्यते' व 'योगः कर्मसु कौशलम्' हेच जीवनाचे खरे शास्त्र आहे. ज्याने मनाचा समतोलपणा साधला तोच खरा योगी. ज्याला चित्ताची

प्रसन्नता लाभली तोच आनंदी. गीतेचा हा विचार जीवनात उतरला तर आत्मसुखापासून माणसाला वंचित व्हावे लागणार नाही. सुखाचा झरा कोठे बाहेर पाझरत नाही. आनंद आपल्या अंतर्यामीच आहे. बाहेरील वस्तूतून आनंद मिळतो हा आपला भ्रम आहे. जवळजवळ ७५ टक्के रोगी हे मानसिक रुग्ण असतात. चिंता, भीती, मोह, चीड, मत्सर, स्पर्धा, नैराश्य, द्वेष हे सर्व असमतोल मनाचे विकार आहेत. ह्या मनाला सशक्त करण्यासाठी समतोल बुद्धीची साथ हवी. स्वधर्म ह्याप्रमाणेच आचरायचा आहे.

दुसऱ्या अध्यायात भगवंतांनी निष्काम कर्मावर व समत्वावर म्हणजे योगावर भर दिला आहे. मानवी जीवनामध्ये मनाचा समतोलपणा (equanimity of mind) हा सुखी व यशस्वी जीवनाचा मंत्र आहे. निम्म्याहून अधिक रोग चिंता, वैफल्य, भीती, द्वेष, नैराश्य, न्यूनगंड अशा अनेक मनोविकारांमुळे होतात. ह्यावर उपाय म्हणजे मनाचा समतोलपणा... ''समत्वं योग उच्यते''.

ह्या अध्यायाच्या शेवटच्या १८ श्लोकांत 'स्थितप्रज्ञ' हा गीतेचा स्वतंत्र विषय आहे. गीतेत - ज्ञानी, भक्त, गुणातीत, कर्मयोगी, संन्यासी ह्या सर्वांचे वर्णन आहे. हे वर्णन उपनिषदांतही आढळते. पण स्थितप्रज्ञ हा गीतेचा खास विषय फक्त गीतेतच! भगवंताच्या लाडक्या मुलाचे वर्णन म्हणजे स्थितप्रज्ञाचे वर्णन. इथे भगवंत अर्जुनाला 'ईश्वर' बनण्याचाच मार्ग दाखवितात. भगवंताशी पूर्ण एकरूप होऊन 'अहं ब्रह्मास्मि'पर्यंत नेऊन सोडण्याची लक्षणे ह्या श्लोकांत कथन केली आहेत.

अशी स्थिती प्राप्त झाल्यानंतर हा जीव ह्या लौकिक जगात कसा राहतो, बोलतो कसा, चालतो कसा, ह्याची उत्कंठा अर्जुनाला आहे. अशा ईश्वररूप झालेल्यांना ओळखायचे कसे, हा अर्जुनाचा प्रश्न.

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ।।५४।।**

ह्या प्रश्नाला उत्तर म्हणून श्रीकृष्णांनी १७ श्लोकांत जे सांगितले आहे, तेच गीतेचे सार आहे, असे महात्मा गांधींना वाटले. स्थितप्रज्ञाचे वर्णन हे गीतेच्या दुसऱ्या अध्यायाचे नवनीत आहे. हा अध्याय सांगून भगवान कृतार्थ झाले आहेत. ह्या श्लोकामागे भगवंताचे हृदय आहे.

त्यातही सुरुवातीचा श्लोक सारभूत! स्थितप्रज्ञाची व्याख्या या पहिल्याच श्लोकात पूर्ण झाली आहे. इतर सर्व श्लोक हे त्यावरील भाष्य आहेत.

**प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।**
**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ।।५५।।**

''हे अर्जुना, जेव्हा मनुष्य मनामध्ये असलेल्या सर्व इच्छा सोडून देतो व



स्वरूपात म्हणजे आत्मस्वरूपातच आपले मन संतुष्ट-तृप्त ठेवतो, तेव्हा त्याला स्थितप्रज्ञ किंवा स्थिरबुद्धीचा म्हणतात.''

ह्यावर ज्ञानेश्वरांचे निरूपण अत्यंत प्रभावी आहे. ते म्हणतात,

**तो कामु सर्वथा जाये । जयाचे आत्मतोषीं मन राहे ।**
**तोचि स्थितप्रज्ञु होये । पुरुष जाणे ।।२९३।।**

ह्या श्लोकापासून स्थितप्रज्ञाची लक्षणे कथन केली आहेत. जो सर्व कामनांचा त्याग करतो तो स्थितप्रज्ञ, हा ह्या व्याख्येचा पहिला भाग व जो आत्मस्वरूपाच्या ठिकाणी संतुष्ट असतो हा त्याचा दुसरा भाग.

वास्तविक कामना ही भगवंताचीच निर्मिती. जीव निर्माण झाला, तेव्हा ईश्वरानेच बुद्धीत कामना निर्माण केली. ह्या कामना-इच्छा असल्याशिवाय ईश्वरप्राप्तीचीसुद्धा अभिलाषा राहणार नाही. हजारो इच्छा सतत होत असल्याने भगवंताच्या प्राप्तीची कामनाच नाहीशी होते. संपूर्ण विश्वाची निर्मितीसुद्धा भगवंताच्या इच्छेतूनच झाली. ''एकोऽहं बहुस्याम् प्रजाजेय'' ह्या इच्छेनेच सृष्टी निर्माण झाली. सकाळी जाग आल्याबरोबर आपल्या मनातसुद्धा इच्छा-कामनांची साखळीच तयार होते. जीव आहे तोवर ह्या कामना राहणारच. सर्व संत-महात्म्यांनासुद्धा अखेरपर्यंत कामना होत्याच. **''दुरितांचे तिमिर जावो । विश्व स्वधर्म सूर्ये पाहो । जो जे वांछील तो ते लाहो । प्राणिजात ।।''** अशी विश्वकल्याणाची कामना ज्ञानेश्वर माऊलींनी आपल्या पसायदानात केली. उसाची कांडी आपल्या उपाशी मुलांना घेऊन येत असताना संत तुकारामांनी रस्त्यातील मुलांना ती वाटून टाकली. विष्णुमय जग वाटणाऱ्या तुकारामांच्या मनातील भेदाभेद केव्हाच संपून गेला होता. सर्व धर्मातल्या संत-महंतांची ही अवस्था आहे. स्थितप्रज्ञाचीही कामना आहे. फक्त ती ईश्वरप्राप्तीची दैवी इच्छा आहे. कामना सदैव राहणार. फक्त त्यांचे स्वरूप बदलायचे. ह्या कामना नैतिक करून हळूहळू त्या आध्यात्मिक करायच्या. यातच मनुष्याच्या दैवी जीवनाचे (divine life) रहस्य आहे. 'आहार-निद्रा-भय-मैथुन' ही प्राण्यांचीही कामना मनुष्यांत असते. पण मानवी बुद्धी ह्याही पलीकडे जाऊ शकते, ''नर करणी करे तो नरका नारायण हो जाये ।'' ही फक्त मनुष्यालाच प्राप्त झालेली ईश्वर-देणगी. नारायण बनण्यासाठी ह्या कामना हळूहळू काढून टाकून त्याचे स्वरूप बदलायचे व त्या व्यापक-विशुद्ध करायच्या. जे भगवंताला आवडते ते करायचे.

**'धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ।'** अ.७ श्लोक ११

'हे भरतर्षभ, सर्व प्राणिमात्रांमध्ये धर्माला अनुसरून असणारी जी इच्छा ती मीच आहे.'' इच्छा नैतिक, धार्मिक झाल्या, तर माणूस धार्मिक, नीतिमान होईल. पण मनाच्या आतल्या सर्व पड्यांतून सर्व पाप-पुण्याच्या शुभ-अशुभाच्या

कामना जातील व केवळ ईश्वरप्राप्तीची इच्छा राहील तेव्हा तो आध्यात्मिक होईल. ही वाटचाल स्थितप्रज्ञ होण्याची आहे.

अशी कामना-मुक्ती झाली की, माणूस अंतःप्रवृत्त होतो. तो आत्म-स्वरूपातच मग्न होतो. आत्मानंदात लीन होतो. हा ब्रह्मानंद वाढतच जातो व ब्राह्मी स्थिती प्राप्त होते.

अशा आत्मिक आनंद प्राप्त झालेल्या साधकाला वस्तुविरहित आनंदाचा लाभ होतो. ही सुखाची सर्वोच्च अवस्था. सामान्य माणूस वस्तूंमुळे मला सुख मिळते, असे समजतो. पण खरी स्थिती वेगळीच आहे. गीतेत भगवंत म्हणतात-

**मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ।। (गीता २-१४)**

हे बाह्यसृष्टीतील पदार्थ-वस्तू हे उद्भवतात व नाशही पावतात. त्यांच्यापासून मिळणारे सुख हे अनित्य आहे. वस्तू असो अथवा नसो, जो आत्मिक आनंदात मग्न होतो तोच खरा सुखी आहे. अशी अवस्था ही विकारांच्या पलीकडची अवस्था आहे. असा साधक सुखदुःखाच्या पलीकडे जाऊन आत्मानंद भोगणारा आहे. आपल्या आत्मिक-आंतरिक सामर्थ्याने जीवन जगणारा पुरुषच ईश्वरी शक्तीचा आविष्कार झालेला पूर्ण पुरुष. प्रत्येक मानवात ही अवस्था आहे. 'पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते.' अशी स्थिती वास्तविक जीवाला लाभलेली आहे. पण नको त्या कामनांच्या मागे लागून ह्या पूर्णावस्थेपासून तो दूर दूर गेला आहे. आत अमृत आहे, पण बाहेर त्याचा शोध आहे.

अशा तृप्त साधकाला भय, दुःख, नैराश्य असे विकार त्रास देत नाहीत. शुभ-अशुभ प्राप्त झाले असता जो विचलित होत नाही, जो कासवाप्रमाणे आपली इंद्रिये विषयांपासून आत ओढून घेतो, ज्याची बुद्धी स्थित झाली आहे व चित्त केवळ ईश्वरात आहे तो स्थितप्रज्ञ होतो.

अशा स्थितप्रज्ञाची लक्षणे एकूण १८ श्लोकांतून सांगितली. त्यातील आणखी काही मांगलिक श्लोक असे -

**ध्यायतो विषयान्पुंसः सङगस्तेषुपजायते ।**
**सङगात्सञ्जायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ।।६२।।**
**क्रोधाद्भवति सम्मोहः सम्मोहात्स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ।।६३।।**
**रागद्वेषावियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ।।६४।।**
**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ।।६५।।**



**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।**
**न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम् ।।६६।।**

''विषयांचे चिंतन करणाऱ्या पुरुषाचा त्या विषयांच्या ठिकाणी संग म्हणजे आसक्ती निर्माण होते. या आसक्तीपासून ते विषय आपल्याला मिळावेत अशी इच्छा, वासना उत्पन्न होते. ते मिळाले नाहीत म्हणजे क्रोध उत्पन्न होतो. क्रोध अनावर झाला की विवेक नाहीसा होतो. त्यापासून स्मृतिभ्रम, स्मृतिभ्रंशापासून बुद्धिनाश आणि बुद्धिनाशापासून त्या पुरुषाचा सर्वनाश होतो.'' (६२ व ६३)

''पण आपला आत्मा म्हणजे अंतःकरण ज्याच्या ताब्यात आहे तो पुरुष प्रीती व द्वेष यांपासून सुटलेल्या व आपल्या स्वाधीन असलेल्या इंद्रियांनी विषयांचा उपभोग घेऊनही त्याचे चित्त सदैव प्रसन्न असते. एकदा मन प्रसन्न राहू लागले की त्याच्या सर्व दुःखांचा नाश होतो. कारण प्रसन्नचित्त असलेल्याची बुद्धी ताबडतोब भगवंताच्या ठिकाणी स्थिर होते.'' (६४ व ६५)

''मन व इंद्रिये ताब्यात नसलेल्या पुरुषाच्या ठिकाणी स्थिर बुद्धी असत नाही. इतकेच नव्हे तर भावना म्हणजे अविचल श्रद्धाही नसते. म्हणून ज्याच्या मनात परमात्म-चिंतनाची गोडीच नाही, त्याचे मन सतत विषयात भरकटत राहिल्याने त्याला कधी शांती मिळत नाही व ज्याला शांती नाही त्याला सुख तरी कोठून मिळणार?'' (६६)

या पाच श्लोकांत जीवनाचे श्रेष्ठ तत्त्वज्ञान भगवंताने सांगितले आहे. विषयचिंतनामुळे सर्वनाश कसा होतो याची परंपरा पहिल्या दोन श्लोकांत सांगितली आहे. विषयांचे चिंतन केल्यानंतर इंद्रिये विषयांकडे जातील व त्यातून कामना निर्माण होतील. कामना-पूर्ती झाली तर लोभ उत्पन्न होईल व पुनःपुन्हा इच्छापूर्ती व्हावी असे वाटायला लागेल व कामाची पूर्तता झाली नाही की, क्रोध येईल. क्रोध व लोभ हे एकाच नाण्याच्या दोन बाजू. क्रोधाने संमोह, संमोहामुळे भ्रम, भ्रमातून बुद्धिनाश व बुद्धिनाशातून सर्वनाश असे हे दुष्टचक्र आहे.

प्रसाद म्हणजे प्रसन्नता! अंतःकरणातील प्रगाढ शांती. विकारांपासून मुक्त झालेल्या अंतःकरणातच प्रसन्नतेचा झरा आहे. मनःशान्ती ही बाहेरची वस्तू नाही. तो आतून स्फुरलेला व स्रवणारा झरा आहे. अशा आत्मतृप्त मनुष्याला मग भोगांपासून मिळणाऱ्या वस्तुसुखाचा लोभ राहत नाही.

फ्रान्समध्ये एक फार मोठा विनोदी नट होता. थिएटरमधल्या सर्व लोकांना तो खळखळून हसवीत असे. असे असूनसुद्धा एक दिवस तो डॉक्टरकडे गेला व म्हणाला, ''माझ्याकडे पैसा, कीर्ती... सर्व काही आहे, पण मनःशान्ती नाही. ह्यासाठी मी काय करू?'' मानसशास्त्रज्ञ म्हणाला, ''अमुक अमुक थिएटरमध्ये एका विनोदी नटाचा सुंदर कार्यक्रम आहे, तो तू पाहा म्हणजे आनंदीत होशील

व तुला मनःशान्ती मिळेल.'' त्यावर तो म्हणाला, ''जो सर्व लोकांना नेहमी हसवतो तोच मी आहे. मला मनःशान्ती नाही म्हणून मी तुमच्याकडे आलो आहे.''

तात्पर्य हे की, हसण्याचा मुखवटा घालून मनःशान्ती प्राप्त होत नाही. सत्ता, संपत्ती, मान-मरातब सर्व काही असूनसुद्धा आत्मसुख लाभतेच असे नाही. चित्तातल्या वृत्तीच माणसाला सुखदुःख देत असतात.

संत तुकाराम उसाच्या कांड्या घेऊन घरी परतत होते. वाटेत मुलांनी ऊस मागितला आणि संत तुकारामांनी सर्वांना त्या कांड्या वाटून टाकल्या. एकच कांडी राहिली होती. ती घरी आणली. हे सर्व त्यांच्या पत्नीने पाहिले. घरी मुले भुकेलेली होती. पत्नीने आकांड-तांडव केला. तुकारामांची निर्भर्त्सना केली. पण तुकारामांच्या समचित्तात अशांती निर्माण झाली नाही. संपूर्ण जगाकडे आत्मौपम्य नजरेने पाहणाऱ्याला दुःख होणार तरी कसे? आणि त्यांची आत्मशांती तरी कशी ढळेल?

एखाद्या विषयापासून निर्माण झालेली आसक्तीच दुःखाला कारणीभूत होते. हे आसक्तीचे बीजच सुरुवातीला उखडून टाकले तर प्रसन्नता निश्चित राहील. असे मन अशांत राहणार नाही. आतून प्रसन्नचित्त होण्याचा हा प्रसाद-गुण ज्याला लाभला तोच प्रपंचातल्या दुःखावर मात करू शकतो. ज्याच्या अंतःकरणातून आसक्ती, राग-द्वेष असे विकार निघून गेले व चित्त शुद्ध झाले त्याला अखंडित प्रसन्नता, संतुष्टता प्राप्त होते व त्याची बुद्धी ईश्वराच्या चरणी स्थिर होते. श्री ज्ञानेश्वर माऊलींनी हा भाव या श्लोकावरील निरूपणात प्रकट केला आहे. ते म्हणतात-

**तैसे हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैचे के आहे ।**
**तेथ आपैसी बुद्धि राहे । परमात्मरूपी ।।३४०।।**
**जैसा निर्वातीचा दीपु । सर्वथा नेणे कंपु ।**
**तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरुपु । योगयुक्तु ।।३४१।।**

''त्याप्रमाणे अंतःकरण प्रसन्न झाले तर मग दुःख कसले आणि कोठले? त्या वेळी परमात्मस्वरूपाच्या ठिकाणी बुद्धी सहजच स्थित होते.'' ।।३४०।।

''ज्याप्रमाणे निवाऱ्याच्या ठिकाणी असलेली दिव्याची ज्योत मुळीच हालत नाही. त्याप्रमाणे योगयुक्त पुरुष स्वस्वरूपी स्थिर बुद्धीने राहतो.'' (३४१)

हास्याचा जन्म अंतःकरणात होतो व मग ते हास्य चेहऱ्यावर उमटते. हास्याचा व्यायाम करता येतो पण खरा हास्ययोग हृदयातून उमटावा लागतो. हास्याची संतुष्टतेची साधना आतून करावी लागते. शुद्ध, निर्मळ मनात हास्य फुलते. ज्याचे हृदय प्रसन्न झाले त्याची बुद्धीही स्थिर होते. असा स्थिरबुद्धीचा



पुरुष कधीही अशांत, विचल होत नाही. अशा योगयुक्त पुरुषाच्या ठायी शांती, संतुष्टता राहते.

पण जो असा योगयुक्त नाही त्याची बुद्धी अस्थिर असते. बुद्धी चंचल झाली की, अशांतता आलीच म्हणून समजा. मग अशा अशांत माणसाला सुख कोठून मिळणार? जिथे शांती तेथे सुख. सुखाचा शोध, बोध हा अंतःकरणातच लागतो. बाहेरच्या वस्तूत सुख आहे हा केवळ भ्रम आहे. सुख व दुःख ही अंतःकरणाच्या वृत्तीवर, स्थितीवर अवलंबून आहेत. म्हणून दुःखाचे मूळ समजावताना, ६६व्या श्लोकावरच्या निरूपणात श्री माऊलीने म्हटले आहे...

**आणि जेथ शांतीचा जिव्हाळा नाही ।**
**तेथ सुख विसरोनि न रिगे कहीं ।**
**जैसा पापियाचा ठायीं । मोक्षु न वसे ।।३४५।।**
**म्हणोनि अयुक्तपण मनाचे । तेचि सर्वस्व दुःखाचे ।**
**या कारणे इंद्रियांचे । दमन निके ।।३४७।।**

''जेथे शांतीचा ओलावा नाही, तेथे सुख चुकूनसुद्धा पाय ठेवत नाही. जसे पापी माणसाच्या ठिकाणी मोक्षाचा वास नसतो.'' ।।३४५।।

''म्हणून मनाची चंचलता हेच दुःखाचे सार आहे. याकरिता इंद्रियांचा निग्रह करावा. ।।३४७।।

म्हणून मनच सुखदुःखाला कारणीभूत आहे. मन प्रसन्न झाले की बुद्धी स्थिर होते. बुद्धी स्थिर झाली की शान्ती निर्माण होते व शांती आली की सुख आलेच.

'चित्त' प्रसन्न झाले म्हणजे सर्व दुःखांचा नाश होतो व बुद्धी स्थिर होते.

असा पुरुष निरिच्छ, ममत्वरहित व निरहंकारी होतो व त्याला शांती प्राप्त होते. अशी ब्राह्मी स्थिती प्राप्त होऊन तो ब्रह्मनिर्वाणाला जातो. अशा आदर्श, स्थितप्रज्ञाची अवस्था समर्पक शब्दांत माऊलींनी यथार्थपणे वर्णिली आहे -

**''ऐसा आत्मबोधे तोषला । तो परमानंदे पोखला ।**
**तोचि स्थितप्रज्ञु भला । वोळख तूं ।।३६६।।**
**तो अहंकाराते दंडोनी । सकळ काम सांडोनी ।**
**विचरे विश्व होऊनि । विश्वाचि माजी ।।३६७।।**
**हे ब्रह्मस्थिती निस्सीम । जे अनुभविता निष्काम ।**
**पातले परब्रह्म । अनायासे ।।३६८।।**

७१व्या श्लोकावरील माऊलींच्या ओव्यातील स्थितप्रज्ञाचे हे वर्णन आहे.

''असा जो आत्मज्ञानाने तुष्ट झालेला व परमानंदाने पुष्ट झालेला आहे तोच खरा स्थिरबुद्धी आहे असे तू जाण.'' ।।३६६।।

“तो अहंकाराला घालवून, सर्व कामना सोडून विश्वामध्ये विश्व बनून, जगद्रूप बनून जगात वावरतो.” ।।३६७।।

दुसऱ्या अध्यायाच्या शेवटच्या ७२व्या श्लोकावरील ३६८ व्या ओवीत या स्थितीचे वर्णन माऊलीने केले आहे.

“ही ब्रह्मस्थिती अमर्याद आहे. जे निष्काम पुरुष हिचा अनुभव घेतात, ते अनायासे परब्रह्माला पोचतात.” ।।३६८।।

दुसऱ्या अध्यायात, हे ज्ञान, ज्याला भगवंत सांख्ययोग या नावाने संबोधतात ते सूत्ररूपाने सांगितले आहे. याच सूत्ररूपाने सांगितलेल्या दैवी विचारांचा विस्तार गीतेतील पुढील सर्व अध्यायांत करण्यात आला आहे. मनुष्याची जीवनदृष्टी बदलणारे हे विचार आहेत.

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।





## अध्याय तिसरा
## कर्मयोग

पाश्चात्त्य देशातील विद्वानांच्या मते भारताचा धर्म काय किंवा तत्त्वज्ञान काय, दोन्ही सारख्या वैराग्याच्याच गोष्टी बोलत असतात. ऐहिकतेविषयीची पराकोटीची उदासीनता व पारलौकिकाविषयीची आत्यंतिक ओढ यांमुळे भारतीयांत कर्माविषयी अनुत्साह व उद्यमरहितता दिसून येते. दोन दिवसांच्या या नश्वर आयुष्यात एवढे सारे कशाला हवे म्हणून निवृत्तिपर विचारांनी हिंदू समाजाला ग्रासले आहे. हिंदू धर्मशास्त्रांनी माणसाला कर्मविमुख, अकर्मण्य बनविले आहे. या प्रवृत्तीमुळेच शौर्य, वीरत्व, तेज यांचा ऱ्हास झाला. म्हणून मोगलांनी, ब्रिटिशांनी आपल्यावर आक्रमण केले, शतकानुशतके राज्य केले. आजच्या वैज्ञानिक युगातसुद्धा भारतीयांची जी पीछेहाट होते आहे त्याला कारणही कर्माविषयीची उदासीनता व आपले अध्यात्मशास्त्र आहे, असा या टीकेचा रोख आहे.

‘गीता’ अभ्यासल्यानंतर आपल्याला दिसून येते की, या प्रकारच्या टीकेत कोणत्याही प्रकारचा सत्यांश, कोणतेही तथ्य नाही. वास्तविक सर्व धर्मांच्या मूलभूत कल्पना, तत्त्वज्ञान, विचार व मर्म एकच आहे. पूर्णज्ञान-प्राप्तीचा व अमृततत्त्वलाभाचा एकमेव मार्ग त्याग, प्रेम, शुचिर्भूत जीवन आहे असे सर्वच धर्मांचे मूलतत्त्व आहे. बायबलमध्ये ठिकठिकाणी वैराग्याचा उपदेश आढळतो. अंतर्बाह्य शुद्धता, शत्रूवरदेखील प्रेम, पापाविषयीची घृणा व पश्चात्ताप यांचेच मार्गदर्शन बायबलने केले आहे. असे असतानासुद्धा अँग्लो-सेक्सन जात लढवय्यी झाली. या जातीतील ‘रजोगुणा’चेच उदात्तीकरण अधिक झाल्यामुळे साम्राज्यशाहीची बीजे त्यातून निर्माण झाली. भारतीयांतील ‘सत्त्वगुणामुळे’ त्यांनी इतिहासात कधी कुणावर आक्रमण केले नाही. गीता म्हणते की, मनुष्य जो धर्म आचरतो, तो त्याच्या प्रकृतिधर्माच्या अनुसार असतो. भारतीयांची प्रकृती ही मूलतः सहिष्णुतेची, समन्वयाची व साधनशुचितेची असल्याने धर्मातील ह्याच तत्त्वांना जीवनात सर्वोच्च स्थान दिले गेले. ज्या महात्मा गांधीजींनी स्वातंत्र्यलढ्याची सूत्रे हालविली व सत्य, प्रेम, अहिंसा यांच्या अधिष्ठानावर आधारित चळवळींनी भारताला स्वातंत्र्य मिळवून दिले. त्यांचे संपूर्ण जीवन गीतेच्या तत्त्वज्ञानाने भरले होते. अनासक्त कर्ममार्गाचा संदेश गांधीजींनी स्वतः आचरला व लोकांना आचरावयास प्रवृत्त केले.

जसा पाश्चात्त्यांनी आपल्या धर्मशास्त्राचा विपर्यास केला, तसाच तो काही भारतीयांनीही केला आहे. आपल्याकडेसुद्धा अध्यात्म म्हणजे निष्क्रियता व कर्माविषयीची उदासीनता व केवळ संन्यस्त व निवृत्तिप्रधान जीवन जगणे असा गैर अर्थ अनेकांनी केला आहे. प्रपंचापासून पलायन, विहित कर्तव्यापासून दूर राहणे व केवळ जप-तप करणे म्हणजेच आध्यात्मिक जीवन जगणे अशा विपरीत कल्पना करून घेतल्यामुळे भारतीय धर्मशास्त्राबद्दलच हे उलटसुलट असे बोलले जाते.

गीतेची शिकवण आहे - 'कर्म कर', 'ऊठ... फलाशा सोडून कर्तव्यकर्म कर... स्वधर्माचरण कर... सर्व कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने, निष्कामबुद्धीने करणे हीच खरी भक्ती आहे. कर्म न करण्याचा आग्रह ठेवू नको.'

सर्व संत-महात्म्यांनी हीच तत्त्वे आचरून आपल्याला धर्मशास्त्राचा, अध्यात्माचा अर्थ समजावून दिला आहे.

गीतेतील तिसरा अध्याय हा 'कर्मयोग' समजावून सांगणारा आहे. सर्व उपनिषदांचे सार असणाऱ्या गीतेतील ३, ४, ५ व १८ या अध्यायांत 'कर्मा'वर भगवंतांनी अधिक भर दिला आहे. कर्म आणि ज्ञान यांच्यातील संबध व सामंजस्य स्थापन करणे हा गीतेतील प्रथम पाच अध्यायांचा विशेष उद्देश आहे. ज्ञान व कर्म या दोन्ही मार्गांचा संबंध नीट न लागल्यामुळे आजही, शास्त्रार्थात हे घोटाळे व विपर्यास होतो आहे. ज्ञानप्राप्तीसाठी कर्म सोडून, संसार सोडून वैराग्याची कास धरली पाहिजे, ह्या चुकीच्या धोरणामुळे काहीही कर्म न करणारा व सतत शून्यात पाहणारा स्वतःला आध्यात्मिक मानू लागला आहे. पण वास्तविक पाहता मोक्षासाठी कर्म सोडण्याची जरूर नाही; इतकेच नव्हे तर या कर्मभूमीत कर्माचा पूर्ण त्याग करणे शक्यही नाही.

युद्धाविषयी अर्जुनाच्या मनातील सर्व अनिश्चय व संशय काढून टाकण्यासाठी भगवंताने दुसऱ्या अध्यायात सर्वप्रथम सांख्यमार्गाप्रमाणे आत्म्याचे नित्यत्व त्याला समजावून दिले. शरीर तर नश्वरच असते, म्हणून कोणाला वीरगती मिळाली म्हणून विषाद करण्याचे कारण नाही. शिवाय क्षत्रिय धर्माच्या आणि लौकिक यशापयशाच्याही दृष्टीतून अर्जुनासारख्या महावीराला युद्ध करणे अपरिहार्यच आहे. असे युद्ध करताना साम्यवृत्ती बाळगल्यास पाप-पुण्याची काहीही बाधा होणार नाही. नंतर अर्जुनाने विचारल्यावर, अशा साम्यवृत्तीने जीवन जगण्याऱ्या स्थितप्रज्ञाचेही भगवंताने वर्णन केले.

पण याने अर्जुनाच्या शंकेचे पूर्ण समाधान झाले नाही. म्हणून तृतीय अध्यायाच्या सुरुवातीलाच त्याने प्रश्न विचारला की,



**ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।**
**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ।।१।।**

कर्माने मनुष्यावर पाप-पुण्याचे बंधन जडते आणि साम्यबुद्धिरूप ज्ञानाने कर्म केल्यास जर ते जडत नाही, म्हणजे कर्मापेक्षा ज्ञान जर श्रेष्ठ आहे, तर मी आपली बुद्धी स्थितप्रज्ञाच्या बुद्धीसारखी सम करून उदासीन का राहू नये? युद्धासारखे घोर कर्म मी का करावे? समबुद्धी पुरुषाला कर्म सोडण्यास काय हरकत आहे? कर्मच केले नाही तर त्याची बाधाही कशी होणार?

भगवंतांनी या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी कर्म, प्रकृती, यज्ञ, स्वधर्म, पापयुक्त कर्म, इंद्रियनिग्रह, लोकसंग्रहासाठी कर्माची आवश्यकता, ज्ञानी माणसाचे कर्म, यज्ञकर्मातून भगवंताला अर्पण करावयाचा वाटा इ. अनेक कर्मसंबंधी विषयांचा विस्तार केला आहे.

भगवान म्हणतात की, या लोकी मोक्षप्राप्तीसाठी दोन प्रकारची निष्ठा आहे. पहिली सांख्यांची ज्ञानयोगाची व दुसरी योग्यांची कर्मयोगाची. पहिली निवृत्ति-मार्गाची व दुसरी प्रवृत्ति-मार्गाची.

पण कर्माचा प्रारंभ केला नाही म्हणजे पुरुषाला 'नैष्कर्म्य' प्राप्त होते असे नाही आणि कर्माचा संन्यास (त्याग) केला म्हणजे तेवढ्यानेच 'सिद्धी' मिळते असेही नाही. वास्तविक कोणीही मनुष्य काही कर्म न करता क्षणभरदेखील राहू शकत नाही. जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत कर्म हे घडत राहणारच. जी विहित कर्मे आहेत त्यांना हट्टाने सोडून दिले तरी इंद्रियांचे स्वभाव काही सोडता येत नाहीत. त्यातून कर्मेंद्रिये कशीबशी आवरून जो मनात विषयांचे चिंतन करीत असतो, तो स्वतःसह इतरेजनांचीही प्रतारणाच करीत असतो. प्रकृतीच्या गुणांनुसार प्रत्येकास कर्म करणे भागच आहे.

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ।।५।।**

"कारण कोणताही माणूस क्षणभरसुद्धा काम न करता केव्हाही राहू शकत नाही. प्रकृतीच्या सत्त्व, रज, तम या तीन गुणांच्या साहाय्याने विश्व निर्माण झाले आहे. त्यामुळे प्रत्येक जण या तीन गुणांच्या ताब्यात असतो. ती प्रकृती या गुणांच्या साह्याने प्रत्येकाकडून सतत काम करवून घेत असते." ।।५।।

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।**
**शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ।।८।।**

"म्हणून तू शास्त्राने, धर्माने नेमून दिलेले कर्म कर. असे कर्म करणे, हे कर्म न करण्यापेक्षा निश्चित चांगले. शिवाय (कर्मबंधाच्या भीतीने) कामच करावयाचे नाही, असे ठरविलेस तर तुझ्या शरीराचे व्यवहारही चालणार नाहीत." ।।८।।

आपण कर्मशील असावे हाच प्रकृतीचा नियम आहे. तसा तो आपला स्वभावही आहे. एक क्षणसुद्धा आपली इंद्रिये स्वस्थ राहत नाहीत. म्हणून तर शरीरात जशी कर्मेंद्रिये आहेत तशी ज्ञानेंद्रियेही आहेत. ज्ञानेंद्रियाने ज्ञान मिळवायचे व कर्मेंद्रियांनी कर्म करायचे. दोन्हींचे असणे हेच जीवन आहे. जसे नदी जोपर्यंत वाहत असते तोपर्यंत तिचे पाणी निर्मल असते. साचले, थांबले, की गढूळ झालेच म्हणून समजायचे. मग त्या पाण्याला दुर्गंधीसुद्धा यायला लागते. मनुष्याचे जीवन जोपर्यंत गतिमान आहे तोपर्यंत त्या जीवनात रस आहे. थांबले की संपले. तैत्तरैय उपनिषदात यासाठी एक महान संदेश आहे -

**''चरन् वै मधु विन्दते**
**चरन स्वादु मुदम्बरम**
**चरैवेति, चरैवेति, चरैवेति, चरैवेति.''**

''जो चालत राहतो त्यालाच जीवनाचे माधुर्य प्राप्त होते.

जे चालत असतात त्यांनाच जीवनाचे गोड, स्वादिष्ट फळ प्राप्त होते.''

''म्हणून चालत राहा, कर्म करीत राहा. थांबू नका.'' जसा सूर्य गतिमान आहे, विश्वाला प्रकाश देत असतो, चंद्र गतिमान आहे, जगाला शीतलता देत असतो तसे मनुष्याने कर्मशील राहून, स्वतः आनंदी होऊन इतरांना आनंद वाटला पाहिजे.

कर्म करीत असतानाच शंभर वर्षे जीवन जगण्याचा उपदेश ईशोपनिषदाने केला आहे.

**''कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीवेषेच्छतं समाः ।''** (ईशो)

''खूप जगा, दीर्घायुषी व्हा पण कर्म करून (ईशो). ज्याने कर्म सोडले त्याचे जीवन चैतन्यहीन, पुरुषार्थहीन, व्यर्थ समजायचे. गती असेल तर चैतन्य, तारुण्य नाहीतर ते वार्धक्यच.''

प्रकृतीने प्रत्येक जीवमात्राला गती दिली आहे. पशु-पक्षी कितीही वय झाले तरी धडपडतात. अन्नासाठी दाही दिशांना मुक्त संचार करतात. घरात किंवा बाहेर वावरणाऱ्या मुंग्यांना पाहिले की, आश्चर्य वाटते. दिवस-रात्र अन्नाचे कण घेऊन सतत मार्गक्रमण करीत असतात. एका मार्गाने जाणाऱ्या, दुसऱ्या मार्गाने येणाऱ्या, कुठेही गडबड, गोंधळ नाही. व्रतस्थाप्रमाणे.

मधमाश्यांचे जगणेही असेच. मैलोन्मैल दूर जाऊन हजारो फुलांतून गंध, रस चाखून मधाचे पोळे निर्माण करतात. त्यांचीही शिस्त, व्यवस्था वाखाणणीय असते. कर्म सतत कसे करावे याचा हा वस्तुपाठच आहे. म्हणून भगवंत म्हणतात की, जे नियत कर्म आहे ते कर्तव्यबुद्धीने पार पाडले तरच जीवन-व्यवहार सुरळीत चालतील. कर्मशील राहिले तर शरीराचे व्यवहारसुद्धा नीट चालतील. कर्म करीत राहिले तरच आपली ऊर्जा-शक्ती कार्यरत राहते.



सर्व संत-महात्म्यांनी हे तत्त्वज्ञान जगून दाखविले आहे. नियत कर्म कसे करावे याचा आदर्श संतांनी घालून दिला आहे.

संत नामदेव, संत एकनाथ, संत तुकाराम यांनी आपली गृहस्थाश्रमांतील सर्व कर्तव्ये पार पाडत भक्ती केली. संत कबीर व दक्षिणेकडील महान संत तिरुवल्लूवर यांनी आपली विहित कर्मे करीत भक्ती केली, महान काव्ये रचली.

मग जर कर्म अटळच आहे तर मनाने इंद्रियांचे नियमन करून आसक्त न होता कर्मेंद्रियांनी जो कर्मयोगाला आरंभ करतो त्याची योग्यता विशेष असते. अशा मनुष्यास त्याचे विकार त्रास देत नाहीत. निष्काम कर्म माणसाला कर्मबंधनापासून मुक्त करते म्हणून भगवंत अर्जुनाला म्हणतात की, त्याने त्याचे नियत कर्म केलेच पाहिजे.

९ ते १६ ह्या श्लोकांत भगवंतांनी यज्ञकर्माचा अधिक विस्तार केला आहे. आपला जो स्वधर्म आहे तोच नित्य यज्ञ असून त्याचे आचरण केले असता पाप लागत नाही व बंधनात तो बद्ध होत नाही.

भगवान श्रीकृष्णांनी 'यज्ञा'चा विस्तार येथे केला आहे.

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ।**
**तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसंगः समाचर ।।९।।**
**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः।**
**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ।।१०।।**

''यज्ञासाठी करावयाच्या कामांशिवाय इतर कामे माणसाला संसारबंधनात टाकतात म्हणून हे कुंतीपुत्रा, आसक्ती किंवा फलाशा सोडून यज्ञासाठी कर्म कर.'' ।।९।।

''पूर्वी यज्ञासह प्रजा उत्पन्न करून ब्रह्मदेवांनी माणसास सांगितले की, या यज्ञानेच तुमची भरभराट होईल. हा यज्ञ तुमच्या इच्छा पूर्ण करणारा होवो.'' ।।१०।।

तिसऱ्या अध्यायातील यज्ञ-संकल्पना हे गीतेचे वैभव आहे. कर्म तरी सतत केले पाहिजे, पण हे कर्मच यज्ञस्वरूप झाले पाहिजे. कर्म जर यज्ञ झाले तरच आपले कल्याण होईल. मग हे कर्म यज्ञ कसे बनेल?

या देशाच्या प्राचीन संस्कृतीत यज्ञाला अपार महत्त्व होते. ऋषी-मुनी, राजे-महाराजे यज्ञ करीत. अग्नीत अनेक वस्तूंचे हवन होत होते. ही आहुती देताना ते म्हणायचे, ''अग्नये स्वाहाः'' ''इन्द्राय स्वाहाः'', ''इदमग्नये इदन्नमम'', ''प्रजापतये स्वाहाः'', ''इदं न मम'' - ''हे मी अग्नीला अर्पण करतो'', ''हे माझ्यासाठी नाही'', ''हे प्रजापतींना, इन्द्राला... इष्ट देवतेला अर्पण करतो'' व अर्पण करत असताना ''हे माझे नाही'' असे याज्ञिकाला म्हणावे लागायचे.

परोपकार करण्यासाठी, विश्वाच्या कल्याणासाठी जे काही कर्म केले जायचे ते यज्ञस्वरूप समजायचे. ज्या कर्मात स्वार्थ नाही पण सेवाभाव आहे ते कर्म यज्ञ! अन्नसुद्धा भक्षण करायचे असेल ,तर यज्ञ केल्यानंतर जे शिल्लक राहते त्यावरच आपला अधिकार आहे. जे स्वतःसाठीच अन्न भक्षण करतात ते पापच ग्रहण करतात, पण इतरांना देय भाग अर्पण करून जे भोग भोगतात ते सर्व पापापासून मुक्त होतात.

जीवनात आनंद, सुख मिळाले तर ते इतरांना वाटले पाहिजे. जितके दुसऱ्यांना देऊ तितके आपल्याला पुन्हा मिळते. गरजणारे ढग आले आणि वर्षाव न करता निघून गेले तर त्या ढगांची शोभा कसली? पण वर्षाव करणारे ढग आत्मतृप्त होतात, कृतार्थ होतात. विहिरीतून जितके पाणी बाहेर काढावे त्याहून अधिक पाणी जिवंत झऱ्यांमुळे विहिरीला मिळत असते. पाणी वाहत असतानासुद्धा वाटेत आलेल्या खळग्यांना भरून पुढे जात असते. जीवन हे कसे, पाण्यासारखे व्हावे. समोरच्या दुःखीकष्टी माणसाचे दुःख होता-होईतो कमी करावे, निदान सहानुभूती, कणव तरी निर्माण व्हावी. दुःख सांगण्यानेसुद्धा कमी होते व सुख देण्याने ते वाढतच असते. यज्ञीय भावना आली की, सेवा, प्रेम, करुणा, निःस्वार्थता येतेच.

**''दुसऱ्याचे दुःखे दुखावे ।**
**दुसऱ्याचे सुखे सुखावे ।**
**अवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ।।''**

संत रामदासांच्या या ओवीतील विश्वकल्याणाची संकल्पना आचरणात येण्यासाठी आपले कर्म यज्ञस्वरूप झाले पाहिजे.

अन्न वाटण्याने अन्नाची गोडी वाढते. धन वाटण्याने त्याला सुगंध प्राप्त होतो. आनंद वाटण्याने आनंद अधिकच वाढतो. जे जे अर्पण करू त्याला प्रसादरूप प्राप्त होते. देवळात देवाला पेढ्यांचा नैवेद्य अर्पण करण्यासाठी आपण घेऊन जातो. जाताना आपण त्याला पेढे म्हणतो, पण अर्पण करून येताना त्याला प्रसाद म्हणतो.

हवनात जे जे आपण अर्पण करतो ते ते अनेक पटीने आपल्याला परत मिळते. शेतकरी शेतात दाणे पेरतो, एका दाण्याचे चारशे दाणे त्याला पुन्हा मिळतात. ''यज्ञौ वै विष्णुः'' असे म्हटले आहे. विष्णू भगवानाचे नाव आहे यज्ञ! या नारायणाला प्रसन्न करण्यासाठी सतत कर्म केले पाहिजे. पण हे कर्म यज्ञरूपात झाले तरच त्याची सार्थकता!

प्रत्येक कर्म यज्ञ व्हावे. याच्या पूर्णतेसाठी किती शक्ती, वेळ, बुद्धी खर्च करावी लागेल याचाही ताळमेळ व्हायला पाहिजे. कर्म करताना ते सिद्धीस



जाईल की नाही या आशंकेने माणसे लडबडतात. अर्ध्यावर डाव सोडून देतात, निराश, हताश होतात. संकटांना तोंड देत ध्येयाप्रत वाटचाल केली पाहिजे. कठोर साधनेला गोमटी फळे मिळतातच या दृढ श्रद्धेने वाटचाल केली पाहिजे. तुम्ही फळाची अपेक्षा करा अगर न करा, योग्य ठिकाणी बीज पेरल्यानंतर ते उगवणारच.

थॉमस एडिसनचे उदाहरण बोलके आहे. ग्रामोफोनचा शोध त्याने लावला. आज म्युझिक सिस्टीमचे टेपरेकॉर्डर, सीडी, स्टिरिओ असे अनेक प्रकार उपलब्ध आहेत; पण त्याची गंगोत्री ग्रामोफोनच्या शोधात आहे. हा शोध लावताना त्याने आपल्या मदतीसाठी जॉर्ज नावाच्या सहाय्यकाला नेमले. एडिसनने त्याला एक यंत्र बनविण्यास सांगितले. सर्व उपयुक्त सूचना दिल्या व थोडा उपदेश केला. एडिसन म्हणाले, ''प्रत्येक कामाला एक विशिष्ट काळ लागतोच. अत्यंत निष्ठेने व सबुरीने तू मन लावून हे काम कर.'' दोन वर्षे जॉर्जने काम केले, पण निष्पत्ती काही निघाली नाही. निराश होऊन त्याने आपला राजीनामा दिला. एडिसनने तो फाडून टाकला व त्याला समजावले, ''हे बघ, भगवंताने जशा समस्या दिल्या आहेत तसेच त्यावरील निवाडाही दिला आहे. फक्त ते शोधायला एक ठराविक काळ लागणारच. मला वाटते, नजीकच्या काळात तू नक्की यशस्वी होशील. यासाठी पुन्हा नव्या दमाने कर्माचा प्रारंभ कर.''

एडिसनचा आशावाद सफल ठरला. जॉर्जने शोध लावून ते यंत्र तयार केले व आनंद व्यक्त केला. घाबरून जर मध्येच पळ काढला असता तर एवढी मोठी सफलता त्याला प्राप्त झाली नसती. श्रद्धा व परिश्रम याच्या जोरावर यश मिळविता येते हे एडिसनचे उद्गार खरे ठरले.

वैदिक काळात 'यज्ञा'ला जे स्थान होते ते नंतरच्या काळात बदलले गेले. ज्ञानेश्वरांनी स्वधर्म म्हणजे विहित कर्म हाच यज्ञ आहे असे प्रतिपादन केले. अशा स्वधर्माचे पालन करीत असता व्रत-वैकल्येसुद्धा करावयाची गरज नाही. स्वधर्म सोडून अन्य देवतांनासुद्धा भजण्याचे कारण नाही. तीर्थयात्रा करण्याचे कारण नाही. केवळ स्वधर्मरूपी यज्ञाचे आचरण कराल तरी कामधेनूप्रमाणे तो तुमच्या इच्छा पूर्ण करील, असे ज्ञानेश्वरांनी स्वधर्मरूप यज्ञाचे प्रतिपादन करताना म्हटले आहे. ते म्हणतात-

**जैसे गतायुषी शरीरी । चैतन्य वासु न करी ।**
**का निदैवाच्या घरी । न राहे लक्ष्मी ।।१०९।।**
**तैसा स्वधर्मु जरी लोपला । तरी सर्व सुखांचा थारा मोडला ।**
**जैसा दीपासवे हरपला । प्रकाशु जाय ।।११०।।**

मृत शरीरामध्ये जसे चैतन्य वास करीत नाही किंवा दुर्दैव्याच्या घरी लक्ष्मी राहत नाही तसा स्वधर्मापासून वंचित राहणारा सर्व सुखांना पारखा होतो.

तिसऱ्या अध्यायातील १२ व १३व्या श्लोकांत भगवंतांनी कृतज्ञतेचा व पाप-पुण्याचा कर्मसंबंधात अर्थ सांगितला आहे. या यज्ञाच्या योगाने तुम्ही देवांना संतुष्ट करा म्हणजे ते देव तुम्हांला समृद्ध करतील. या यज्ञाच्या तुष्टतेने देव तुम्हांला इष्टभोग देतील. कृतज्ञतेने त्यांना न देता त्यांनी दिलेल्या वस्तूंचा जो उपभोग घेतो तो चोर होतो.

**इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ।**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ।।१२।।**

"यज्ञशेष भक्षण करणारे सज्जन लोक सर्व पापांपासून मुक्त होतात. यज्ञ न करता केवळ आपल्यासाठीच (अन्न) शिजवितात ते पापी लोक पाप भक्षण करतात."

भगवंताने येथे कठोरपणाने कानउघाडणी केली आहे. स्तेन म्हणजे चोर, दरोडेखोर असा कृतघ्नांसाठी उल्लेख केला आहे. आपले वैभव, संपत्ती यज्ञात उपयोगी पडणारी सामग्री आहे. ज्या अन्नाच्या योगाने यज्ञ सिद्धीला जातो ते अन्न ब्रह्मरूप आहे. स्वधर्मरूपी यज्ञाने भगवंताचा वाटा न देणारे उन्मत्त पुरुष केवळ पापांची राशी होतात.

पुढील श्लोकांत यज्ञाच्या उत्पत्तीविषयीचा उल्लेख आहे. अन्नापासून भूते उत्पन्न होतात. पर्जन्यापासून अन्न उत्पन्न होते. यज्ञापासून पर्जन्य होतो आणि कर्मापासून यज्ञाची उत्पत्ती होते. कर्माची उत्पत्ती ब्रह्मापासून म्हणजे प्रकृतीपासून आहे असे जाण आणि हे ब्रह्म अक्षरापासून म्हणजे परमेश्वरापासून निघाले आहे म्हणजे सर्वत्र ब्रह्मच नेहमी यज्ञात अधिष्ठित असते.

अशा कर्माचे अगर यज्ञाचे चक्र या जगात जो पुढे चालवीत नाही त्याचे आयुष्य पापरूप असून तो केवळ इंद्रियांचे लाड करणारा पापी पुरुष होय.

श्लोक क्र. १७ ते २४ मध्ये भगवंतांनी निष्काम कर्म व लोकसंग्रहाचे महत्त्व विशद केले आहे. जो मनुष्य केवळ आत्म्यातच रत, आत्म्यातच तृप्त आणि आत्म्याच्या ठायीच संतुष्ट झालेला असतो त्याला (स्वतःचे म्हणून) काही कार्य (शिल्लक) राहत नसते. या जगात त्या मनुष्याला कर्म करूनही काही मिळवावयाचे असत नाही किंवा न करण्यानेही काही साधावयाचे असत नाही; त्याचा जगात काहीही स्वार्थाशी संबंध नसतो. तरीदेखील त्याच्याकडून केवळ लोकहितार्थ कर्मे होत असतात. म्हणून अर्जुनाने असेच निष्काम, अनासक्त होऊन कर्तव्यकर्म करीत राहावे. कारण निष्काम कर्म करणाराच मोक्षपदाचा अधिकारी होऊ शकतो, असे भगवंत सांगतात. एकोणिसाव्या श्लोकात, अशा ज्ञानी पुरुषाला परमगती प्राप्त होते असे ते म्हणतात.



**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।**
**असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पुरुषः ।।१९।।**
**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।**
**लोकसंग्रहमेवापि सम्पश्यन्कर्तुमर्हसि ।।२०।।**
**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ।।२१।।**

"ज्ञानी पुरुष याप्रमाणे वागत असतो म्हणून तूही आसक्ती न ठेवता आपले कर्तव्यकर्म नेहमी करीत जा. कारण फळाची अपेक्षा न ठेवता जो आपले कर्तव्यकर्म करीत जातो, त्यालाच परमगती प्राप्त होते." ।।१९।

"जनकादिक राजानी याप्रमाणे कर्म करूनच मोक्ष मिळविला. शिवाय लोकांना सन्मार्ग दाखविण्यासाठीही तुला कर्म केलेच पाहिजे." ।।२०।।

(कारण) "जगात श्रेष्ठ पुरुष जसे वागतात तसेच इतर सामान्य लोक वागतात. थोर लोक जी गोष्ट प्रमाण म्हणून स्वीकारतात त्याचेच इतर लोक अनुकरण करतात." ।।२१।।

कर्माचा मुळीच त्याग न करता जनकादी ज्ञानी पुरुषांनी याप्रमाणेच सिद्धी मिळविली. लोकसंग्रहाकडे दृष्टी देऊनही कर्म करणे तुला उचित आहे. जे मिळवावयाचे ते ज्यांनी मिळविले, त्यांनीदेखील लोकांना वळण लावण्याकरिता कर्म करणे प्राप्त आहे. आंधळ्याच्या बरोबर चालून डोळस माणूस त्याला सांभाळून घेतो. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाने आचरण करून अज्ञानी पुरुषाला धर्म स्पष्ट करून दाखवावा. श्रेष्ठ पुरुष जे आचरण करतो त्याचे अनुकरण इतर लोक करतात. या जगात संत-महात्मे जे कर्म करतात, त्यालाच सामान्य लोक धर्म म्हणतात. त्यामुळे अशा संत-सज्जनांनी कर्माचे आचरण विशेष स्वरूपाने केले पाहिजे.

**"येथे वडिल जे जे करिती । तया नाम धर्मु ठेविती ।**
**तेचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ।**
**हे ऐसे असे स्वभावे । म्हणौन कर्म न सांडावे ।**
**विशेषे आचरावे । लागे संती ।।"**

असा श्रेष्ठ पुरुषांनी आचरावयाच्या कर्मासंबंधी ज्ञानेश्वरांचा विशेष उल्लेख आहे. भगवंतांनीसुद्धा अवताररूपामध्ये असेच विशेष कर्माचरण करून लोकांसमोर आदर्श ठेवला आहे. वास्तविक भगवंताला कर्तव्य असे काहीच राहिले नसतानादेखील केवळ समाजपुरुषाच्या प्रबोधनासाठी कर्मे करणे भाग पडले. म्हणून ज्ञानी पुरुषानेदेखील लोकसंग्रहासाठी अनासक्त होऊन कर्म करावे. लोकसंग्रह म्हणजे काही थोतांड नव्हे. ते विशेष आचरण आहे, हे भगवंतांनी

स्वतःच्या उदाहरणानेच विशद केले आहे. कर्माच्या ठिकाणी आळस करून जर भगवंताने हे केले नसते तर लोकांनीही हाच कित्ता गिरविला असता. भगवंताने हे कर्म केले नसते तर हे लोक उत्सन्न म्हणजे नष्ट होतील. कर्माच्या ठिकाणी आसक्त झालेल्या अडाणी लोकांच्या बुद्धीचा ज्ञानी पुरुषाने भेद करू नये. ज्ञानी पुरुषाने स्वतः निष्कामबुद्धीने अनासक्त होऊन कर्म करावे व इतरेजनांसमोर आदर्श ठेवावा, असा अर्जुनाला भगवंत सल्ला देतात.

तिसऱ्या अध्यायात भगवंतांनी लोकसंग्रहावर असाच भर दिला आहे. लोकसंग्रह याचा अर्थ रूढार्थाने आपल्याभोवती लोक गोळा करणे नव्हे. हा अर्थ गीतेला अभिप्रेत नाही. लोकांना वळण लावण्याकरिता ज्ञानी माणसाने स्वतः आचरण करून लोकांना कित्ता घालून द्यावा, असा याचा अर्थ आहे.

असे कर्म ज्ञानपूर्वक झाले पाहिजे, हा गीतेचा आग्रह आहे. फळाची आशा सोडून यज्ञ-भावनेने कर्म व्हावे. पण असे कर्मसुद्धा प्रथमतः शुद्ध, निर्मळ असावे.. म्हणून ज्ञानाने ते कर्म समजून घ्यावे. अंतःकरणातील शुद्धता हीच कर्माची प्रेरणा. कारण चित्तशुद्धी झाली की, तेथे ज्ञान प्रतिष्ठित होते. त्यानंतर केलेल्या कर्मात निर्मलता, पवित्रता येते. असे कर्म निष्काम भावनेने व निःसंग होऊन घडल्यामुळे त्या कर्माला यज्ञाचे स्वरूप येते. असे कर्म होणे हीच भक्ती! अशा भक्तीने आत्मोद्धारही होतो व हातून जगत्कल्याणही होते. तिसऱ्या अध्यायातील कर्मयोगाचे स्वरूप हे असे आहे. विश्वातील प्रत्येक जीव, प्राणिमात्र प्रकृतीच्या गुणांमुळे सतत कर्म करीत असतात. मनुष्याचे कर्म हे यज्ञीय भावनेने झाले की, त्यात परोपकार, सेवा, निःस्वार्थता आल्यामुळे त्याला सुगंध प्राप्त होतो. महात्मा गांधींनी मृत्यूपर्यंत अनासक्त होऊन सतत कर्म केले. गांधीजींनी गीतेतील अनासक्त कर्म जीवनभर आचरणात आणले. गीतेची शिकवण प्रत्यक्ष आचरणात आणून कसे जगावे याचा वस्तुपाठ विनोबा भावेंनीसुद्धा असाच दाखविला. जगातील महान पुरुषांनी आपल्या आयुष्याच्या अखेरपर्यंत सतत कर्मशील राहून मानवतेची सेवा केली आहे. संत तुलसीदास, सूरदास, वाल्मिकी अशा संतांनी अखेरच्या श्वासापर्यंत काव्यरचना केली. जसे आपल्या संस्कृतीत तसेच पाश्चात्त्य संस्कृतीतसुद्धा, कर्म श्रेष्ठ मानून प्लेटो, होमर, गॅलिलिओ, कोपरनिकस, आइन्स्टाईन अशा कवी, दार्शनिक, वैज्ञानिक यांनी दीर्घकाळ मानवतेच्या कल्याणाची कास धरली. या श्रेष्ठ पुरुषांना कर्मरत असताना वार्धक्याची जाणीवदेखील झाली नाही. महात्मा बुद्ध, गुरुनानक, संत नामदेव अशा श्रेष्ठ संतांच्या ठायी वृद्धत्वाची कोणतीही खूण नव्हती. सतत भ्रमण करीत व उपदेश देत ते अखेरपर्यंत कार्यशील राहिले. महात्मा गांधी वृद्धावस्थेतसुद्धा इतके भरभर चालत की, तरुणांनीसुद्धा याचा आदर्श घ्यावा. वैज्ञानिक कथा लिहिणारा



एच. जी. वेल्स हा महान लेखक अंथरुणावर खिळला होता. पाय तुटल्यामुळे अपंग झाला होता. अशाही अवस्थेत ज्ञानसाधना सोडली नाही. वयाच्या ७०व्या वर्षानंतर त्यांने बारा पुस्तके लिहिली. टेनिसन या महान कवीने ८० व्या वर्षी 'क्रॉसिंग द वार' नावाचे पुस्तक लिहिले. अमेरिकेचे माजी राष्ट्राध्यक्ष अब्राहम लिंकन हे आपली कामे कोणालाही करू देत नसत. एक दिवस आपले बूट पॉलिश करत असताना एक मित्र त्यांना म्हणाला, ''आपण एवढ्या महान पदावर असताना हे असले काम का करता?'' लिंकननी उत्तर दिले, ''काय तुम्ही तुमचे बूट दुसऱ्यांकडून पॉलिश करून घेता? आपले काम आपण करणे यातच मोठेपण आहे. दुसऱ्याकडून आपले काम करून घेणे हा काही पुरुषार्थ नव्हे.''

जगाच्या महान पुरुषांनी वृद्धत्व आले तरी ते स्वीकारले नाही. जे मनाने तरुण असतात ते अखेरपर्यंत कर्मशील असतात. पण तरुण असूनसुद्धा जर मनाने खचलेला असेल तर शक्तिहीन, अकार्यक्षम, अनुत्साहित झालेला तो तरुण वृद्धच म्हणायचा. जोपर्यंत आपण स्वयंपूर्ण असतो, आशावादी असतो, उत्साही व कार्यशील असतो तोपर्यंत वय जरी वाढले तरी वृद्धत्व आपल्यापासून दूरच राहते.

मनुष्यास जगण्याचा मंत्र गीतेने दिला आहे. भगवान श्रीकृष्णाचा हाच संदेश आहे की, कर्म करीत राहा. परोपकार करीत राहा, निराश न होता प्रयत्न करीत राहा. प्रत्येक कर्म यज्ञीय भावनेने करीत राहा.

शरीर मनाद्वारे नियत कर्म चालू ठेवूनही स्वतः कर्मरहित राहावयाचे हीच खरीखुरी अकर्म वा कर्मरहित अवस्था! संपूर्ण कर्मरहित अवस्थेप्रत पोहोचल्याखेरीज ज्ञानाचा लाभ होणार नाही; परमशांती लाभणार नाही. परंतु याचा अर्थ इंद्रिये आवरून स्वस्थ बसले पाहिजे असा नाही. अशा कौशल्याने काम करता आले पाहिजे की कर्म घडत असतानाही निष्काम भाव ठेवता आला पाहिजे. बाहेरून प्रवृत्ती व आतून निवृत्ती किंवा संन्यस्त वृत्ती असली पाहिजे. म्हणजेच कर्म निष्काम भावनेने व अनासक्त होऊन करता आले पाहिजे.

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।**
**अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ।।२७।।**

''प्रकृतीच्या (सत्त्व, रज, तम या) गुणांनी सर्व प्रकारची कर्मे होत असतात. अहंकाराने पछाडलेला अज्ञानी, मूढ पुरुष मी कर्ता आहे असे मानतो.''

तिसऱ्या अध्यायातील वरील श्लोकात कर्माचे रहस्य विशद केले आहे. कर्मयोग दोन पायांवर उभा आहे. एक अनासक्ती व दुसरा अहंकारमुक्ती! अध्यात्माच्या प्रांतात साधकाकडे या दोन गोष्टी नसतील तर त्याची साधना कितीही उच्च कोटीची असो; कितीही तो शास्त्रपारंगत असो; जिभेवर सर्व

शास्त्रे नाचत असोत तरी हे संपूर्ण व्यर्थच. या अहंकाराच्या बाबतीत ज्ञानेश्वर माऊलींचे भाष्य खूप मार्मिक आहे ते म्हणतात-

**तैसा चित्ती अहंते ठावो । अणि जिभे सकळशास्त्रांचा सरावो ।**
**ऐसेनि कोडी एक जन्म जावो । परी न पविजे माते ।।**

चित्तात अहंकार असेल व सर्व शास्त्रे मुखोद्गत असतील तरी एक कोटी वेळा जन्म जरी घेतला तरी परमेश्वरप्राप्ती कधीही होणार नाही. तिसऱ्या अध्यायातसुद्धा अहंकारमुक्तीच्या बाबतीत त्यांचे निरूपण असे -

**तैसी शुभाशुभ कर्मे । जिये निफजती प्रकृतिधर्मे ।**
**तिये मूर्ख मतिभ्रमे । मी कर्ता म्हणे ।।१७८।।**
**ऐसा अहंकाराधिरूढ । एकदेशी मूढ ।**
**तया हा परमार्थ गूढ । प्रगटावा ना ।।१७९।।**

अहंकारामुळे ज्याचे मन मोहित झाले आहे, असा मनुष्य मीच कर्ता आहे असे मानतो. गुण व कर्म यांच्या विभागांचे तत्त्व जो जाणतो तो गुणांचा आपसात हा खेळ चालला असे समजून आसक्त होत नाही. पण मूर्ख माणसाला ही शुभाशुभ कर्मे आपल्याच कर्तृत्वाने घडताहेत असे वाटते. सूर्याच्या प्रकाशात प्राणिमात्रांचे सर्व व्यवहार होत असतात, पण सूर्य जसा लिप्त होत नाही तसे साधकाने कमलपत्राप्रमाणे निरहंकारी होऊन कर्मे केली पाहिजेत. असे जर झाले नाही तर कोणाही मनुष्यास परमार्थलाभ होऊ शकत नाही.

फळाची आसक्ती न धरता जो कर्तव्यबुद्धीने व निरिच्छ, निरहंकारी बनून कर्म करतो, त्याला फळाची आसक्ती धरून कर्म करणाऱ्यापेक्षा अधिक दिव्यानंद लाभतो.

माणूस जितक्या निःस्वार्थपणे कर्म करतो तितकाच त्याचा 'मी' बोध हळूहळू कमी होतो. कर्म हे शरीर, मन, इंद्रिये बदलून टाकण्याचे शस्त्र आहे. कर्माचे महत्त्वाचे फळ चित्तशुद्धी आहे. सुख-दुःख, फायदा-तोटा, यशापयश यांच्याकडे न पाहता सतत सत्कर्मे करीत राहिल्यास अज्ञानाचे जे मूळ तो अहंकारच हळूहळू नष्ट होत जाईल. अध्यात्म मार्गातील 'अहंकार' हा सर्वांत मोठा अडथळा आहे. 'मी' व 'माझे' ही सतत असणारी आठवणच आपल्याला उन्नत मार्गापासून खेचत असते. या 'अहं'ला विस्तृत, व्यापक केल्याशिवाय त्यातून सुटका नाही.

सामान्य माणूस मात्र ह्या सर्व बंधनातच जखडलेला असतो. 'मी', 'अहं' हे त्याला विहिरीतल्या बेडकाप्रमाणे मर्यादित विश्वात स्वार्थी बनवून सोडतात. माणसाच्या सर्वच कर्मामागील उद्दिष्ट ही स्वार्थप्रेरणा व अहंकाराची पूजा असते. तो शिकतो, पैसा कमावतो, लौकिक मिळवितो, संसार करतो ते स्वतःला सुख



मिळावे म्हणूनच. पत्नी-पुत्रादिकांवरील प्रेमसुद्धा या 'अहं'च्या पोषणासाठीच असते. जिथे-जिथे 'अहं' पुष्ट होतो त्या त्या सर्व ठिकाणी त्याचे मन रमते व ज्या ठिकाणी 'अहं'ला बाधा पोचते, 'मी'पणा दुखावला जातो, त्या ठिकाणी त्याचे मन दुःखी होते. व्यवहारातल्या साध्या साध्या गोष्टीतसुद्धा या 'अहं'मुळे सुख-दुःखाच्या गर्तेत मनुष्य सतत सापडत असतो. म्हणूनच अर्जुनाला निमित्त करून आम्हा सर्वांनाच भगवंतानी हे कर्मरहस्य ह्या सत्ताविसाव्या श्लोकातून सांगितले आहे.

फलकामना हेच सर्वनाशाचे मूळ आहे. ही फलकामनाच माणसाला अज्ञानात, कर्मबंधनात अडकून ठेवते. ती माणसाला सतत स्वार्थपरायण व स्वकेंद्रित बनवत असते. अहंकाराची भावना ही या फलकामनेमुळेच वाढते व पुष्ट होते. फलाकडे लक्ष न ठेवता कर्तव्यबुद्धीने अनासक्त होऊन कर्म केल्यामुळेच खऱ्या सुखाचा, प्रेमाचा लाभ होऊ शकतो, हे सत्य येथे भगवंतांनी विशद करून सांगितले आहे. फलाकडे लक्ष ठेवले नाही तरच तुम्ही योगी व्हाल, ज्ञानी व्हाल, भक्त व्हाल व तुमचे सर्व दुःख दूर होईल, हेच अर्जुनाच्या निमित्ताने त्यांनी आपल्याला सांगितले आहे.

माझ्या हातून जे घडते ते केवळ प्रकृतीच्या गुणांमुळेच. मी केवळ निमित्तमात्र आहे, साधन आहे, कर्ता नव्हे. हे सत्य जर उमजले व प्रत्यक्ष अनुभवले तर हळूहळू आत्मसुखाचा, अक्षय आनंदाचा लाभ झाल्याशिवाय राहणार नाही. व्यावहारिक जगात माणसाला थोडे यश, कीर्ती, धनसंपदा लाभली की माणूस हुरळून जातो. सत्ता-संपत्तीमुळे त्याला आपणच सर्वेसर्वा आहोत असे वाटायला लागते. ईश्वर, प्रकृती, पूर्वसंचित, संस्कार हे सर्व थोतांड आहे असे समजून निरीश्वरवादाच्या गप्पा मारायला लागतो. अशा अहंकारी व्यक्तीसाठी हे कर्मरहस्य ह्या तिसऱ्या अध्यायातील या श्लोकामध्ये समजावले आहे.

''निर्ममो निरहंकार'' हे स्थितप्रज्ञाचे व उत्तम भक्ताचे प्रमुख लक्षण गीतेतील अनेक अध्यायांत भगवंतांनी ठासून सांगितले आहे. हा दैवी गुण आहे. कर्म जर दिव्य, उदात्त किंबहुना परमेश्वराला आवडणारे असे बनवायचे असेल तर कर्त्याच्या मनातील (अहं) दूर झाला पाहिजे. 'मी', 'माझे' व 'मम'पण नष्ट झाले पाहिजे. कर्माची प्रेरणा निरिच्छ भावनेतून आल्याशिवाय हे शक्य नाही.

ज्ञान, कर्म व भक्ती यांचा समन्वय हे गीतेचे वैशिष्ट्य आहे. गुण व कर्मे ही 'स्व'हून भिन्न आहेत असे ज्ञान होणे व प्रकृतीचा हा खेळ मानून जो त्यात रमत नाही अशा भक्तांनी सर्व कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने करणे हीच खरी भक्ती! कृष्णार्पणबुद्धीने सर्व कर्मे केली पाहिजेत, कर्मे ही सोडावयाची नाहीत हेच कर्मरहस्य पुन्हा तिसाव्या श्लोकात भगवान समजावून सांगतात.

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।
निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ।।३०।।

''(यासाठी हे अर्जुना) माझ्या ठिकाणी अध्यात्मबुद्धीने सर्व कर्मांचा संन्यास म्हणजे अर्पण करून आणि (फलाची) आशा व ममत्व सोडून तू निर्धास्तपणे युद्ध कर!''

अशा बुद्धीने कर्म करणारा कर्मबंधनातून सुटतो. युद्धातून जी हत्या होईल त्याचा दोष, पाप कर्त्याला लागणार नाही. व्यवहारातदेखील कर्माच्या पाप-पुण्याबद्दल अनेक वेळा संभ्रमित अवस्था होत असते. डॉक्टर व चोर दोघांकडेही पोट फाडणारे सुरे असतात. दोघांच्याही कर्मामागील हेतू वेगवेगळे असल्यामुळे कृती जरी एक असली तरी डॉक्टराचे कर्म पुण्यदायक व चोराचे कर्म पापमूलक ठरते. निष्पाप स्त्रीवर अत्याचार होत असताना तिची सुटका करण्यासाठी प्रयत्न करताना एखाद्याने जरी मनुष्यहत्या केली तरी ह्या कर्माने दोष निर्माण होणार नाही. कोर्टात न्यायाधीशाला अनेक वेळा अपराध्यांना फाशीची शिक्षा सुनवावी लागते. म्हणून काही मनुष्यवधाचे पाप त्यांच्या माथी बसत नाही. हे जर व्यवहारात असे आहे, तर अध्यात्माच्या, भक्तीच्या प्रांतात ईश्वरार्पणबुद्धीने निर्मम व निरहंकारी होऊन कर्मे करणारा कर्मबंधनातून पूर्णपणे दोषमुक्त होणार नाही का? म्हणूनच भगवंत अर्जुनाला निःशंक होऊन युद्ध करण्यास प्रवृत्त करत आहेत.

अध्यात्म म्हणजे केवळ ब्रह्म, माया, प्रकृती इत्यादींचा शाब्दिक काथ्याकूट नव्हे, पांडित्यपूर्ण निष्फळ चर्चा नव्हे. अध्यात्माचा प्रत्यक्ष जीवनाशी संबंध आहे. दैनंदिन जीवनात सर्व अवस्थांमध्ये माणसाने कर्म कसे करावे, कसे वागावे याचे जर दिग्दर्शन शास्त्रे करणार नसतील तर सर्वसामान्य माणूस शास्त्राची कास कशी धरेल? किंबहुना ह्या अध्यात्मशास्त्राची गरजच काय? संसारातील कोलाहलात, रोग-दैन्य शोकावस्थेत, पश्चात्तापाने झालेल्या नैराश्यात, यशापयशामुळे झालेल्या सुख-दुःखातून, काम-क्रोधातून, मृत्यूच्या घोर कालरात्रीतून अध्यात्मशास्त्राने माणसाला दिशा, दिलासा, मार्ग दाखविला पाहिजे व तसे ते दाखविते...

'गीता' हे जीवनशास्त्र आहे. भगवंताने जो उपदेश केला आहे तो जीवनात प्रत्यक्ष आचरण करण्यासाठीच केला आहे. अर्जुन म्हणजे आपण सर्वच जण. अर्जुनाच्या सर्व शंका-प्रश्न हे सर्व आपल्या जीवनाशीच निगडित आहेत. तिसऱ्या अध्यायातील कर्मयोग आपल्या जीवनात आणणे हीच खरी ईश्वरभक्ती. खरे-खुरे धर्माचरण करण्यासाठी संसार सोडून संन्यास घेणे नव्हे. कर्मसंन्यासापेक्षा कर्मयोगच श्रेष्ठ आहे. कारण संन्याशालासुद्धा कर्म सुटत नाही. भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला 'युद्ध कर' असा उपदेश करतात, तर उद्धवाला बदरिकाश्रमी जाऊन



अनन्यचित्ताने जप-तप-ध्यान करून धर्मलाभ घेण्याचा सल्ला देतात. अर्जुन-उद्धव ह्यांचा प्रकृतिधर्म वेगवेगळा असल्याने व विहित कर्म किंवा स्वधर्म निरनिराळे असल्याने कर्मसुद्धा वेगवेगळे करण्याचा मार्ग गीता दाखविते. देश-काळ-पात्र-भेदानुसार धर्म नाना प्रकारे प्रकटत असतो. पण शास्त्रातील मूळ कर्मप्रेरणा बदलत नाहीत. कर्मफळाची आकांक्षा सोडून निःस्वार्थ होऊन कर्मे करणे हीच खरी कृतिभक्ती. कृतीशिवाय भक्ती साध्य नाही. कृतिभक्ती हेच कर्मयोगाचे सार! भगवंताचे काम भगवंताला अर्पण करून निरहंकारी होणे हीच कृतिभक्ती... हाच कर्मयोग... सर्व संतांनी हाच कर्मयोग आचरला. संत नामदेव-ज्ञानदेव-तुकाराम अशा संतांनी व विवेकानंद-रामकृष्ण अशा आध्यात्मिक श्रेष्ठ महात्म्यांनी हा कर्मयोग प्रत्यक्ष आचरून गीताशास्त्र हे जीवनशास्त्र आहे हे दाखविले आहे.

कर्मयोगाचा आणखी एक उद्देश आहे. शक्तिक्षय निवारण करणे किंवा शक्तीचा अपव्यय टाळणे. ''योगः कर्मसु कौशलम्'' - कर्म करण्याचे कौशल्य हाच योग आहे. एखाद्या कामात जेवढी शक्ती लावणे आवश्यक आहे, तिच्यापेक्षा कमी नको व जास्तही नको. शारीरिक शक्तिसंचय करून तीच मानसिक व आध्यात्मिक शक्तीत परिणत करणे हीच खरी कर्मयोगाची शिकवण आहे. भोगी व फलकामना ठेवून कर्म करणाऱ्यांची शक्ती अशीच वाया जात असते. शिवाय त्यांना दुःख हे अपरिहार्य असते. कारण इंद्रियाधीन झालेल्या भोगी लोकांचा ही इंद्रियेच सत्यानाश करण्यास कारणीभूत ठरतात. पण कर्मयोगाचे अधिष्ठान लाभलेले संयमी, निरहंकारी व फलाकांक्षा न बाळगणारे हे ज्ञानयोग्याप्रमाणेच सर्व सिद्धीस पात्र होतात.

तिसऱ्या अध्यायाच्या उत्तरार्धात अर्जुन कर्माच्या पाप-पुण्यासंबंधी भगवंताला प्रश्न विचारतो. हा प्रश्न तुम्हा-आम्हा सर्वांचा अत्यंत जिव्हाळ्याचा आहे.

अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पुरुषः ।
अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ।।३६।।

अर्जुन विचारतो, ''हे वार्ष्णेया (कृष्णा)! आता (असे सांगा की) स्वतःची इच्छा नसताही बलात्कार केल्याप्रमाणे मनुष्य पाप करतो ते कोणाच्या प्रेरणेने?''

अनेक वेळा मनुष्याच्या हातून त्याच्या मनात नसतानाही पापकर्मे घडतात. मोहाच्या क्षणी अनेक विवेकी माणसे मनात नसतानाही विपरीत कर्म करावयास उद्युक्त होतात. आध्यात्मिक क्षेत्रात उन्नत अवस्थेला पोचलेली काही साधक मंडळीदेखील पापकर्मास बळी पडतात तिथे सामान्य माणसाचे काय! दैनंदिन जीवनात पावलोपावली मोह व क्रोध याला बळी पडून चोरी, दरोडे, बलात्कार, खून यांसारखी कुकर्मे माणसाच्या हातून घडत असतात. या सर्वच प्रसंगी मनुष्य जाणूनबुजून विचाराने पाप करतो असे नाही. इच्छा व प्रवृत्ती नसतानासुद्धा

सात्त्विक मनुष्य पाप करतो, हे कोणाच्या प्रेरणेने हा अर्जुनाचा प्रश्न आहे.

भगवंत अर्जुनाला उत्तर देतात,

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।**
**महाशनो महापाप्मा विद्धयेनमिह वैरिणम् ।।३७।।**

''याबाबतीत रजोगुणापासून उत्पन्न झालेला मोठा अधाशी व मोठा पापी असा हा काम व क्रोध हाच मनुष्याचा सर्वात मोठा शत्रू आहे असे समज.'' पुढील ३८, ३९ ह्या श्लोकांमध्ये भगवंत म्हणतात की, धुराने अग्नी किंवा धुळीने आरसा किंवा वारेने जसा गर्भ आच्छादला जातो तसे ह्या काम-क्रोधाने माणसाचे ज्ञान, विवेक झाकून जातो. भागवतात याचे सुंदर प्रतिपादन केले आहे.

**''न जातु कामः कामानाम् उपभोगेन शाम्यति ।**
**हविषा कृष्णवर्त्मेव भूय एव अभिवर्धते ।।भागवत।।**

माणसाच्या इच्छा, भोग हे त्यांचा उपभोग घेऊनसुद्धा तृप्त होत नाहीत. एक इच्छा दुसऱ्या इच्छेला त्याच्या पूर्ततेनंतर जन्म देते. तूप अग्नीत टाकल्यानंतर अग्नी जसा भडकतो तसेच भोगाचे, कामाचे, इच्छेचे आहे. काम म्हणजे इच्छा किंवा भोग. केवळ लैंगिक इच्छा असा अर्थ 'काम' या शब्दातून अभिप्रेत नाही. रजोगुणांमुळे काम, क्रोध उत्पन्न होतात. हा काम कधी तृप्त होणारा नाही. इच्छा, वासना कधी संपत नाहीत. भोगापासून तृप्ती कधी होत नाही. एक इच्छा पूर्ण झाली की दुसरी त्यातूनच निर्माण होते. शरीर व इंद्रिये थकतात, शिथिल होतात; पण मनातल्या वासना कधी मिटत नाहीत. कितीही भोग भोगत राहिले तरी मन शांत होत नाही.

ययाती राजाने त्याला मिळालेल्या वराने, आपल्या मुलाकडून तारुण्य मागून घेतले. तीनशे वर्षे ययाती जगला. प्रपंचातले सारे भोग पुनःपुन्हा भोगले. पण तृप्ती झाली नाही. म्हणून 'न जातु कामः ...' हा महान श्लोक त्याच्या तोंडी आला.

सत्ता, संपत्ती, कीर्ती, पद यांनी तृप्तता कधी येत नाही. पुनःपुन्हा हे भोगावेसे वाटते. या ईषणा मनुष्यास कधीही तृप्त करीत नाहीत. ज्ञानी असो अगर साधक असो, सामान्य असो अथवा महान, सर्वांना नामशेष करण्याचे सामर्थ्य या काम-क्रोधात आहे. या रजोगुणाचे यथार्थ वर्णन ज्ञानेश्वरीत आले आहे. ते असे -

**हे जळेवीण बुडविती । आगीवीण जाळिती ।**
**न बोलता कवळिती । प्राणियांते ।।२५७।।**

''अर्जुना, हे काम, क्रोध असे आहेत की ज्यांच्या मनात दयेचा साठा मुळीच नाही. हे काम, क्रोध प्रत्यक्ष यमधर्म आहेत असे समजले जाते.''



''हे पाण्यावाचून बुडवितात, अग्नीवाचून जाळतात आणि प्राण्यांना गुपचूप घेरतात.''

मनुष्याचे खरे वैरी हे काम-क्रोध आहेत. रजोगुणांपासून निर्माण झालेले हेच खरे पापी आहेत. तेच मनुष्यास पाप-प्रवृत्त करतात. ह्यांचे दमन केले पाहिजे. पण ते त्यांना जाणून, समजून घेऊन. शरीरात ठाण मांडून बसलेल्या या वैऱ्यांना निग्रहाने, दृढ संकल्पशक्तीने, जागरूक राहून हळूहळू निपटून काढले पाहिजे. मोहाचा एक क्षणसुद्धा मोठमोठ्या तपस्व्यांचे तप हरण करणारा ठरू शकतो. तिथे सामान्यांचे काय?

पण भगवंताने आपल्या अंतःकरणात एवढी ऊर्जा दिली आहे की, दृढ निश्चयाने या काम-क्रोध विकारांनाही आपण संयमित करू शकतो. महान व्यक्तींच्या ठायीसुद्धा हे विकार असतातच. पण आपल्या ऊर्जेला महान कार्यांमध्ये गुंतवून ही माणसे इतकी कार्यरत असतात, व्यग्र, मग्न असतात की, विकार त्यांच्यापासून दूरच राहतात. पण आळस, अज्ञान, तामसी आहार, अभद्र विचार यांनी मोहग्रस्त झालेले लोक या काम-क्रोधाचे बळी ठरतात.

म्हणून सात्त्विक आहार, विचार, चिंतन करून मनाचे उन्नयन केले पाहिजे. नामस्मरण, योगाभ्यास, भजन, कीर्तन यांनी मनाची जडणघडण झाली पाहिजे. जेवढी सात्त्विकता वाढेल तेवढे हे महान शत्रू निष्प्रभ होतील. इंद्रिय निग्रह, संयमित जीवन हाच त्यावरील उपाय. भगवंताने शेवटी हाच उपदेश केला आहे. इंद्रियांपेक्षा मन मोठे, मनाहून बुद्धी व बुद्धीहून आत्मा श्रेष्ठ आहे. या क्रमाने मनुष्याने स्वतःला नियंत्रित करावे.

तिसऱ्या अध्यायातील शेवटच्या चार श्लोकांमध्ये या काम-क्रोधाला कसे आवरायचे व त्यांचे अधिष्ठान यासंबंधीचे विवेचन आहे.

**इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।**
**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ।।४०।।**
**तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।**
**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ।।४१।।**

''इंद्रिये, मन आणि बुद्धी हीच या काम-क्रोधाची अधिष्ठान म्हणजे घर आहेत. यांच्याच आश्रयाने ज्ञानाला गुंडाळून ठेवून मनुष्याला हा मोहित करतो. म्हणून इंद्रियांचे प्रथम नियमन करून हे भरतश्रेष्ठा! ज्ञान (अध्यात्म) आणि विज्ञान (विशिष्ट ज्ञान) यांचा नाश करणाऱ्या याच काम-क्रोधरूपी पाप्यांना तू ठार मारून टाक.''

पुढे सहाव्या अध्यायात या इंद्रिय-दमनाविषयी अधिक विस्तार भगवंतांनी केला आहे. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये अशी दहा इंद्रिये मनुष्याच्या पापकर्मास

जरी कारणीभूत असली तरी ह्या इंद्रियांपेक्षा मन व मनाच्याही पलीकडे बुद्धी व बुद्धीच्याही पलीकडे तो आत्मा आहे. म्हणून शेवटच्या श्लोकात या काम-क्रोधावर कसा विजय मिळवायचा हे अर्जुनाला भगवंत सांगतात.

**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।**
**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ।।४३।।**

"याप्रमाणे बुद्धीच्याही पलीकडल्याला (आत्म्याला) ओळखून व आपणच आपल्याला आवरून धरून हे महाबाहो अर्जुना! दुरासाध्य कामरूपी शत्रूला तू मारून टाक."

कामरूपी आसक्ती सोडून लोकसंग्रहार्थ सर्व कर्मे स्वधर्माप्रमाणे करणाऱ्याला इंद्रिय-निग्रह कसा आवश्यक आहे त्याचे मर्यादित विवेचन या अध्यायात झाले आहे. सर्व कर्मांचे कर्तृत्व जरी प्रकृतीकडे असले तरी सर्व कर्मे भगवंताला अर्पण करावीत, ह्या भक्तिमार्गातील सूत्राचे सूतोवाच या कर्मयोग अध्यायात झाले आहे.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**





## अध्याय चौथा

## ।। ज्ञानकर्मसंन्यासयोग ।।

"परमेश्वराच्या ठिकाणी अध्यात्मबुद्धीने सर्व कर्मांचा संन्यास करून म्हणजे सर्व कर्मे त्यांच्या चरणी अर्पण करून, फलाची आशा व ममत्व सोडून कर्मे केली पाहिजेत. कर्म कोणालाही चुकत नाही. निष्कामबुद्धीने सर्व कर्मे करावीत. ज्ञानाने स्वार्थबुद्धी सुटली तरी कर्म सुटत नाही. म्हणून ज्ञात्यानेही निष्काम कर्म लोकसंग्रहार्थ करावे"... अशा प्रकारे कर्मयोगाचे विवेचन तिसऱ्या अध्यायात झाले आहे. या चौथ्या अध्यायात कर्म व ज्ञान याविषयीचे हेच विवेचन दृढ केले आहे. ३, ४ व ५ ह्या तीन अध्यायांत कर्मासंबंधीचा व्यापक विषय भगवंतांनी अर्जुनास समजाविला आहे. त्यामुळे या अध्यायाचे 'ज्ञान-कर्मसंन्यास योग' हे नामाभिधान समर्पक, अर्थपूर्ण असे योजिले आहे.

चौथ्या अध्यायाच्या सुरुवातीस काही मूलभूत प्रश्नांची चर्चा घडली आहे. पुनर्जन्म, अवतार, कर्माचे अनादित्व, कर्म-अकर्माची चर्चा व अध्यायाच्या उत्तरार्धात ज्ञान, श्रद्धा-अश्रद्धा, अज्ञान ह्यांचे विवेचन झाले आहे. पहिल्या तीन श्लोकांत कर्माचे अनादित्व समजाविले आहे. भगवंत म्हणतात की, कधीही क्षीण न होणारा किंवा त्रिकालाबाधित व नित्य असा हा योग प्रथम मी विवस्वानाला म्हणजे सूर्याला सांगितला. सूर्याने आपला पुत्र मनू यास सांगितला, मनूने इक्ष्वाकुस व त्यानंतर राजर्षींना माहीत झाला, पण दीर्घकालाने या लोकी नष्ट झाला. अर्जुना, तू माझा भक्त व सखा असल्यामुळे तोच पुरातन योग, उत्तम रहस्य म्हणून मी आज तुला सांगत आहे.

ह्यावर बुद्धिवादी अर्जुनाच्या मनात शंका, प्रश्न निर्माण झाला आहे. "तुमचा जन्म अलीकडचा व विवस्वानाचा त्याआधीचा. तुम्ही (हा योग) आधी सांगितलात हे मी कसे जाणावे?" - अर्जुनाच्या या शंकेवर भगवंतांनी आपल्या पुनःपुन्हा होणाऱ्या जन्मरहस्याबद्दल सविस्तर विवेचन केले.

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ।।५।।**

"हे अर्जुना! माझे आणि तुझे पुष्कळ जन्म होऊन गेले आहेत. ते सर्व मी जाणतो. हे परंतपा, तू ते जाणीत नाहीस."

ह्या ठिकाणी भगवंतांनी पुन्हा एकदा पुनर्जन्माविषयी ठामपणे सांगितले आहे. गीता पुनर्जन्माचे तत्त्व पुरस्कारिते- हा सिद्धान्त दुसऱ्या व आठव्या अध्यायातदेखील मांडला गेला आहे. मृत्यू हाच जीवनाचा शेवट नाही. मृत्यूनंतर जीवन अस्तित्वात आहे. कर्मांच्या सर्व पाप-पुण्याचा हिशोब 'यचि देही याचि डोळा' जरी या जन्मात चुकता झाला नाही, तरी पुढील जन्मात तो चुकता करावाच लागतो. ही धारणा पक्की आहे. दुसऱ्या अध्यायात याविषयीचे दोन श्लोक ह्या सिद्धान्ताचे अधिक स्पष्टीकरण करतात. ''जातस्य हि ध्रुवो मृत्युः ध्रुवं जन्म मृतस्य च...'' जो जन्मला त्याला मृत्यू निश्चित आहे, जुनी वस्त्रे टाकून देऊन नवी वस्त्रे परिधान करावीत, त्याप्रमाणे आत्मा जुनी शरीरे टाकून दुसऱ्या नव्या शरीराशी संगम पावतो.

**देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं योवनं जरा ।**
**तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ।।२.१३।।**

''देह धारण करणाऱ्यास या देहात ज्याप्रमाणे बालपण, तरुणपण आणि म्हातारपण प्राप्त होते त्या प्रमाणेच दुसरा देह प्राप्त होत असतो. म्हणून याबाबतीत ज्ञानी पुरुष मोह पावत नाहीत.''

वास्तविक सेकंदा-सेकंदाला अव्याहत देह बदलत असतो. बालपण केव्हा संपले व तारुण्य केव्हा सुरू झाले तो क्षण जसा निश्चित नसतो, किंवा प्रौढपणाच्या किंवा म्हातारपणाच्या छटा चेहऱ्यावर केव्हा दिसायला लागल्या ह्याचा निश्चित काळ ठरविता येत नाही. ही प्रक्रिया सतत चालू असते. देहधर्मानुसार ह्या तिन्ही अवस्थांप्रमाणे देहाचे मरण ही अवस्था आहे व त्यानंतरची दुसरा देह धारण करण्याची आत्म्याची अवस्था. ह्या सर्व अवस्था प्रत्येक क्षणी घडतच असतात. ज्याला हे समजते तो ज्ञानी! प्रत्येक क्षणी काही पेशींचे मरण घडत असते व दुसऱ्या काही जन्म पावत असतात. वयाने मोठे होत असतो म्हणजे मृत्यूच्या समीप जात असतो आणि मृत्यूच्या वेळी ज्या ज्या भावाचे स्मरण करीत अखेरीस देह सोडतो, त्या त्याच भावाप्रमाणे पुढील जन्म धारण करतो. मृत्यूच्या वेळी परमेश्वरचिंतन घडावयाचे असेल तर इंद्रियांना जन्मभर तसे वळण असावे लागते. ज्या ज्या वस्तूंची वासना ऐकून शेवटी प्राण जातो त्या त्या वासनेप्रमाणेच पुढील गती मिळते.

म्हणून सतत भगवंताचे स्मरण आवश्यक आहे. गीता-पठण किंवा परमेश्वर-चिंतन मी निवृत्तीनंतर करतो किंवा अध्यात्म हे वृद्धापकाळी करावयाचा उद्योग आहे असे म्हणणाऱ्या महाभागांना इंद्रियांच्या चंचलतेमुळे व अस्थिर मनबुद्धीमुळे भगवंताच्या चिंतनात आनंद मिळत नाही. चित्तवृत्ती रमत नाहीत व केवळ भीती



व उपचार म्हणून (God-fear mentality मुळे) ते ईश्वराप्रत काहीतरी करून त्या भ्रामक सुख-समाधानात शेवटचे क्षण व्यतीत करतात.

चौथ्या अध्यायात पुनर्जन्म व ईश्वरावतार ह्या दोन गोष्टी स्पष्ट स्वरूपात भगवंताने मांडल्या आहेत.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।।७।।**
**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।।८।।**

''हे भारता! जेव्हा जेव्हा धर्माची ग्लानी होऊन अधर्माचे प्राबल्य माजते तेव्हा मी आपणहून स्वतःच जन्म (अवतार) घेत असतो.''

''साधु-सज्जनांच्या संरक्षणार्थ आणि दुष्टांचा नाश करण्यास युगा-युगातून धर्मसंस्थापनेसाठी मी जन्म घेत असतो.''

वास्तविक भगवंत निराकार आहेत. पण स्वतःच्याच प्रकृतीचा (मायेचा) आश्रय घेऊन सगुण-साकाररूपाने नटतात.

**''तया संगाचेनि सुरवाडे ।**
**मज विदेहा देह धरणे घडे ।।** (ज्ञानेश्वरी)

भक्ताच्या ओढीने, सज्जनांच्या सहवासासाठी देह धारण करावा लागतो. अवतारकार्यात असुरांचा, दुष्ट प्रवृत्तींचा नाश करून सज्जनांचा मान-सन्मान प्रस्थापित केला जातो. धर्म व नीती यांचे रक्षण तरी होतेच, पण आत्मसुखाने जग भरून जाते. श्रद्धा बळकट होतात. न्यायाच्या-सत्याच्या-सात्त्विकतेच्या वातावरणात पापक्षय होऊन पुण्याचा प्रातःकाळ सुरू होतो. अशाचसाठी अवताराचे आगमन होते. अशा प्रकारचे दिव्य जन्मकर्म जो जाणतो तो खरा विवेकी, ज्ञानी!

युगी-युगी ते निरनिराळे देह धारण करीत असले तरी अवतार निरनिराळे नाहीत. ते एकच होत. वेगवेगळ्या प्रयोजनानुसार जेव्हा ज्या भावाची आवश्यकता असते तेव्हा त्याच भावाने प्रकट होऊन ते लोकोपदेश करीत असतात. आपल्या अलौकिक कार्याने आदर्शांची पुनर्रचना करीत असतात.

आपल्या ह्या भरतभूमीत ते अनेकदा अवतीर्ण होऊन जगाला मार्गदर्शन-उपदेश करून गेले आहेत. यथार्थ ज्ञानाचा व भक्तीचा आदर्श येथेच आढळतो. आपल्या देशाची प्राणशक्ती धर्मच आहे. आपण त्या उपदेशाप्रमाणे कितपत जगतो हा चिंतनाचा व चिंतेचाच भाग आहे. पण आपले सर्व व्यवहार, रीतीभाती, जीवनपद्धती ही सर्वच धर्मलाभाकरिता आहे. भौतिक प्रगतीच्या बाबतीत इतर प्रगत देशांच्या तुलनेने आपली पीछेहाट जरी झालेली असली तरी जगाला देण्यासारखे जे काही आपल्याकडे आहे ते म्हणजे आपले तत्त्वज्ञान, अध्यात्मज्ञान,

मानवाला अंतिम सुखी करण्याचे शास्त्र! धर्माच्याच बळावर भारत एकेकाळी जगाच्या शीर्षस्थानी होता व याच बळाने जगाला मार्गदर्शन करण्याचे सामर्थ्य अजूनही आपल्या धर्मशास्त्रात आहे. अवतारांमुळे भारताची भूमी अधिक संपन्न झाली आहे.

आपल्या दिव्य जन्माविषयी भगवंत म्हणतात,

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ।।९।।**
**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ।।१०।।**

''माझे याप्रकारचे दिव्य जन्म व दिव्य कर्म यांतील तत्त्व जो जाणितो, तो देहत्यागानंतर पुन्हा जन्मास न येता, हे अर्जुना! मला येऊन मिळतो.'' ।।९।।

''ज्यांची प्रपंचाविषयीची आसक्ती सुटलेली आहे, ज्यांना कशाचेही भय वाटत नाही, ज्यांनी आपला क्रोध आवरलेला आहे, मलाच सर्वस्व मानणारे, माझ्याच आश्रयास आलेले अनेक लोक (याप्रमाणे) ज्ञानरूप तपाने शुद्ध होऊन माझ्या स्वरूपाला येऊन मिळाले आहेत.'' ।।१०।।

माझी दिव्य कर्मे जे लोक जाणतात, माझ्या येण्याचे प्रयोजन जे समजतात त्यांना हा देह सोडल्यानंतर पुन्हा जन्मप्राप्ती नाही. पहिल्या श्लोकातील हा भावार्थ दुसऱ्या श्लोकाशी जोडलेला आहे. भगवंताच्या जन्मकर्मातील दिव्यता जाणणारा कसा असतो याचे वर्णन १०व्या श्लोकात केले आहे. ह्या एका श्लोकात ईश्वरप्राप्तीचे रहस्य भगवंतांनी सांगितले आहे.

आसक्ती, भय व क्रोध यांपासून जो मुक्त झाला तोच या संसारचक्रातून सुटू शकतो. तोच भक्त भगवंताची प्राप्ती करून घेतो. ''मन्मय होणे'' म्हणजे भगवंताच्या दिव्य गुणांचे सतत अनुसंधान ठेवणे, ज्याचे सतत चिंतन होते त्यासारखेच आपण होतो. जेव्हा भगवंताशिवाय दुसऱ्या कशाचेही चिंतन होत नाही, केवळ भगवंताच्या भरवशावर जे राहतात व त्याचाच आश्रय जे घेतात तेच भगवंताजवळ जातात.

आसक्ती सुटली म्हणजे वैराग्य येते. ज्ञान प्रतिष्ठित झाले की, वैराग्य येते. ''ज्ञानस्य पराकाष्ठा वैराग्यम् ।'' ज्ञान जेव्हा परम सीमेवर पोहोचते तेव्हा वैराग्य प्राप्त होते. ज्ञान प्राप्त झाले, वैराग्य आले व आसक्ती सुटली की भीती नाहीशी होते. परमात्म्याला शरण जाण्यानेही भीतीमुक्त होता येते. महापुरुष निर्भय असतात, कारण ते भगवंताच्या सान्निध्यात असतात. परमात्म्याच्या षड्ऐश्वर्यात त्याची निर्भयता हा मोठा गुण आहे.



पुनर्जन्म व अवतार या दोन विषयांनंतर भगवंतांनी भक्तीसंबंधीचे सुंदर विवेचन ११व्या श्लोकात केले आहे. हा श्लोक भक्तांसाठी खूप सुंदर आहे. सतत मनन करण्यासारखा आहे.

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ।।११।।**

''जे जसे मला भजतात त्यांना तसाच मीही भजतो. (तसेच फळ देतो) हे पार्था, मनुष्यमात्र सर्व प्रकारांनी माझ्या मार्गाचेच अनुसरण करतात.''

या श्लोकावर ज्ञानेश्वर माऊलींनी उत्कृष्ट भाष्य केले आहे. भगवंताच्या मनातील भाव अधिक स्पष्टरूपाने शब्दबद्ध केला आहे. ते म्हणतात-

**एऱ्हवी तरी पाही । जे जैसे माझा ठाई ।**
**भजती तयां मीही । तैसाचि भजे ।।६६।।**
**देखे मनुष्यजात सकळ । हे स्वभावता भजनशील ।**
**जाहले असे केवल । माझा ठायीं ।।६७।।**
**परी ज्ञानेवीण नाशिले । जे बुद्धिभेदासी आले ।**
**तेणेचि या कल्पिले । अनेकत्व ।।६८।।**
**म्हणवूनि अभेदी भेदु देखती । यया अनाम्या नामे ठेविती ।**
**देवी देवो म्हणती । अचर्चा ते ।।६९।।**

''जे जशी माझी भक्ती करतात त्यांच्यावर मी त्याचप्रमाणात प्रेम करतो. सर्व मनुष्यमात्रांचा स्वाभाविक कल माझी भक्ती करण्याकडेच असतो. पण ज्ञान नसल्यामुळे त्यांच्या ठिकाणी भेदबुद्धी उत्पन्न होते. त्यामुळे मी जो एक त्या माझ्या ठिकाणी अनेकत्वाची कल्पना करतात, अभेदाच्या ठिकाणी भेद पाहतात; जो नामरहित आहे त्याला ते नावे देतात. देव, देवी म्हणतात. त्याच्या ठिकाणी भेदाभेद किंवा प्रतवारी करतात.''

या एका श्लोकात भक्तीचे रहस्य सामावले आहे. आपली भक्ती ज्या दर्जाची, जितकी उत्कटतेची आहे, तेवढीच ती भगवंताच्या चरणी रुजू होते. एक पैशाची भक्ती करून १६ आणे किंवा १०० पैशांची फळे किंवा भगवत्प्रेम प्राप्त करण्याकडे या कलियुगात लोक अपेक्षा करतात. अध्यात्मात सर्व काही रोखठोक आहे. हे पूर्ण शास्त्र आहे. काही निरीश्वरवाद्यांना वाटतो तसा भोंगळपणा नाही. ईश्वरी न्याय कुठेही अन्याय करणारा नाही. बऱ्याच जणांची तक्रार असते की, आम्ही इतक्या वेळा मंदिराला जातो, इतका प्रसाद, दानधर्म करतो, इतक्या वेळा नामस्मरण करतो, पूजापाठ करतो; पण ईश्वराची कृपा मात्र जशी व जेवढी पाहिजे तेवढी नाही. सकाम भक्तीत फळाची अपेक्षा करून हेतुपूर्ण

भक्ती करणाऱ्यांना अपेक्षित साध्य प्राप्त झाले नाही की, संशयाची बीजे निर्माण होतात. भक्तीची तीव्रता कमी होते. ईश्वराच्या चरणी सर्व कर्मे वाहून अत्यंत व्याकुळतेने निष्काम भक्ती करणाऱ्या साधकांना तितकी उच्चावस्था निश्चित प्राप्त होते, हे आपल्याला अनेक साधु-संतांकडे, महापुरुषांकडे पाहिल्यावर जाणवते.

मनुष्य स्वभावतःच भक्तिशील आहे. पण ईश्वरी स्वरूपाचे यथार्थ ज्ञान नसल्यामुळे त्याच्या अस्तित्वाविषयीच्या वेगवेगळ्या कल्पना तो करून घेतो. वास्तविक ईश्वर सर्वत्र व्याप्त आहे. त्याचे ज्यात अस्तित्व नाही असे ठिकाण व वस्तू जगात नाही. संपूर्ण विश्व ईश्वरमय आहे. तो केवळ देवळातील मूर्तीतच आहे असा नाही. काही ठिकाणीच तो जागृत आहे व इतरत्र घोर निद्रेत आहे असा नाही. ईश्वर सर्वांच्या हृदयात आहे. प्रत्येक जीव हा ईश्वराचाच अंश आहे हे भगवंतांनी इतरही अध्यायांत पुनःपुन्हा सांगितले आहे. तो जसा निर्गुण, निराकार आहे तसा भक्तांसाठी तो सगुण, साकारदेखील आहे. पूर्णांशाने जसे अवतार घेऊन या भूमीवर अवतीर्ण होतो तसाच तो अंशरूपानेदेखील अवतार घेतो. ईश्वरी तत्त्व सर्वत्र सारखे व एकच असते. पण अज्ञानी मनुष्य त्याचीच विविध रूपे पाहताना विविध देव-देवतांच्या नावाचा जप-जाप्य करत असताना एकाच परमात्म्याच्या ठिकाणी भेदा-भेद करतो. हे सर्व केवळ अज्ञानाने होते. भोग, काम व सांसारिक वस्तूंच्या प्राप्तीसाठी कनिष्ठ देव-देवतांची पूजा करून तो सर्वव्याप्त परमात्म्यालाच विसरतो.

इथे ज्ञानी भक्ताच्या भक्तीचे कौतुक आहे. भक्ताला ज्ञानाची आवश्यकता आहे की नाही? ज्ञानयुक्त भक्तीने ईश्वराजवळ जावे की केवळ हृदयाने? हृदय व बुद्धी या दोन्हींची भक्तीत आवश्यकता आहे की केवळ एकाचीच? ज्ञान व भक्ती यांचा समन्वय योग्य की केवळ ज्ञान व केवळ भक्ती... अशा अनेक प्रश्नांची चर्चा, वाद पूर्वापार चालत आलेला आहे. चौथ्या अध्यायात ज्ञानाची महत्ती भगवंतांनी विशद केली आहे. ११व्या श्लोकांत ही सुरुवात झाली आहे.

भक्तिमार्गाच्या व ज्ञानमार्गाच्या साधकांमध्येच हा वाद आहे. दोन्ही मार्गाच्या आचार्यांमध्ये नाही.

योग, कर्म, ज्ञान, भक्ती हे सारेच भाव एकाच भगवंतापासून उदय पावले आहेत. या चार मार्गांचा समन्वय करूनच ईश्वरी प्रेम प्राप्त होऊ शकते. यथार्थ ज्ञानी व भक्त यांत खरोखर विरोध नाही. भगवान जगद्गुरू शंकराचार्य हे ज्ञानमार्गाचे उपासक. पण ह्या ज्ञानाचार्यांनी भावोत्कटतेने लिहिलेली गंगा, शंकर, अन्नपूर्णा, विष्णू इत्यादींवरील स्तोत्रे वाचल्यावर शंकराचार्य उत्कट भक्तश्रेष्ठ नव्हते असे कोणी म्हणेल? वास्तविक भक्ती व ज्ञान यांचे चरमलक्ष्य एकच. 'मी' व 'माझे', 'अहं'चा नाश करण्यासाठी ज्ञानी व भक्त दोघेही सारखीच साधना करतात.



यथार्थ भक्ती करण्यासाठी ज्ञान, भक्ती, कर्म ही तिन्ही आवश्यक आहेत. गीतेत ह्या तिन्हींचा समन्वय साधला आहे.

ज्ञान-विचार-विरहित भक्ताचे मन भजन-कीर्तन-ध्यानाच्या वेळी तल्लीन, एकाग्र होते. पण ती अवस्था संपल्यानंतर पुन्हा विषयांच्या प्रलोभनात अधीन होते. त्रैलोक्यसुद्धा ज्याला राहावयास अपुरे आहे अशा स्वभावतःच चंचल असणाऱ्या मनाला लगाम घालण्यासाठी बुद्धीची, ज्ञानाची, विचारांची, विवेकाची अत्यंत आवश्यकता आहे. मन व बुद्धी या दोन्ही ईश्वरार्पण केल्याशिवाय यथार्थ भक्ती साधत नाही. मन-मुख एक करणे याचेच नाव यथार्थ साधना.

भक्तीचे आचार्य नारदऋषी यांनी भक्तिसूत्रात भक्तीचे प्रमुख लक्षण म्हणून "सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा" असे स्वरूप सांगितले आहे. भगवंताविषयी जो अनन्य प्रेमभाव, त्याचेच नाव भक्ती.

ज्याचे मन सदा भगवंताशी युक्त आहे असा एकभक्ती-विशिष्ट ज्ञानी पुरुष हाच श्रेष्ठ भक्त आहे. एका भांड्यातून दुसऱ्या भांड्यामध्ये तेल ओतत असताना त्याची धार जशी एकसारखी अखंड पडत राहते तशीच एकभक्तीची धार मोह, विषय, अहंरूपी वायूच्या वाऱ्याने कधी खंडित वा पातळ होत नाही. असा ज्ञानी भक्त "**वासुदेवः सर्वमिति ।(७.१९)**" चा अनुभव घेत सर्वच काही ईश्वरमय आहे, ज्ञान प्राप्त करतो.

चौथ्या अध्यायाच्या उत्तरार्धात ज्ञान, त्याचे सामर्थ्य, श्रद्धा हे विषय आल्यामुळे त्याची थोडीअधिक मीमांसा इथे केली आहे. तसा हा विषय भक्ती व कर्म या दोन्हींना अनुलक्षून आहे. कर्म करीत असताना ते कर्म मी का करावे, याचे ज्ञान जर नसेल व ज्ञानयुक्त भक्तीचा अभाव असेल तर यथार्थ भक्ती कशी घडेल?

हे समजाविण्यासाठी पुन्हा एकदा कर्माच्या स्वरूपासंबंधीचे विवेचन भगवंतांनी केले आहे. भगवंत म्हणतात -

चौथ्या अध्यायात भगवंतांनी अर्जुनाला माध्यम करून वर्णव्यवस्थेसंबंधी विवेचन केले.

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**
**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ।।१३।।**

"(ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र याप्रकारे) चार वर्णांची व्यवस्था गुण व कर्म यांच्या भेदाप्रमाणे मीच निर्माण केली आहे. मी तिचा कर्ताही आहे आणि अकर्ता म्हणजे ती न करणारा अव्यय (मीच) आहे, हे तू लक्षात ठेव."

गुण, कर्म, स्वभाव हे ध्यानात घेऊन प्रत्येक व्यक्तीच्या कर्मानुसार चारी वर्णांची रचना भगवंताने केली. एवढे करून देखील भगवंत यापासून अलिप्त आहेत. हे वर्ण जन्मावर आधारलेले नसून स्वभावधर्मावर आधारलेले आहेत.

ज्ञानाची उपासना करणारे, सर्वांचे रक्षण करणारे, व्यापार करणारे व सेवा करणारे असे हे चार वर्ग आहेत.

पण खरे म्हणजे प्रत्येक व्यक्ती ही ब्राह्मणही आहे, क्षत्रिय, वैश्य व शूद्रही आहे. या चौघांचेही कर्म प्रत्येक व्यक्ती करीत असते. कधी ज्ञानसाधना तर कधी रक्षण करण्यासाठी क्षात्रवृत्तीचा अंगीकार व उदरनिर्वाहासाठी व्यापार, दानधर्म व शेवटी स्वच्छता, शुद्धता राखण्यासाठी कधी स्वयंपरिश्रमाचा मार्ग अनुसरावा लागतो. चार प्रकारच्या वेगवेगळ्या शक्ती आहेत. बुद्धिशक्ती, शस्त्रशक्ती, वित्तशक्ती व श्रमशक्ती. या चारही शक्तींचा मेळ घातल्याशिवाय समाजाची घडी बसत नाही. चातुर्वर्ण्य व्यवस्थेत या समाजव्यवस्थेचा विचार केला आहे. सर्व लोक वस्तुतः एकच खरे. परंतु स्वधर्म व स्वभावगुण यांच्यामुळे चार वर्णांत त्यांची विभागणी झाली. गुणकर्मांमुळे ही व्यवस्था झाल्यामुळे भगवंत म्हणतात की, मीं त्यांचा कर्ता नाही."

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ।।१७।।**

"कर्माची गती, त्याचे खरे स्वरूप कळणे अत्यंत कठीण आहे. (म्हणून) कर्म म्हणजे काय हेही जाणले पाहिजे व निषिद्ध कर्म कोणते हेही नीट समजून घेतले पाहिजे. याबरोबर अकर्म म्हणजे काय हेही कळावयास पाहिजे."

कर्म-विकर्म-अकर्म या तिन्हींना नीट समजून घे म्हणून भगवंत अर्जुनास सांगत आहेत. कारण कर्माची गती गहन आहे. संकल्प-विकल्प करून मनुष्य जी कर्मे करतो ती त्याज्य नाहीत, पण ते संकल्प शुभ असावेत. त्यामुळे यज्ञीय भावनेने शुभ कर्मे घडतील. कर्म हातून घडल्यानंतर आसक्ती, स्वार्थ न वाढता मनात प्रसन्नता निर्माण होईल असे कर्म घडावे. कर्म म्हणजे सुकर्म की, ज्यात मनुष्य कर्मबंधनात सापडत नाही. अशुभ कर्मे मनुष्याला शांती कधी देत नाहीत. विकर्म म्हणजे विपरीत कर्म. जिथे स्वार्थ, अन्याय, लोभ, क्रोध, वासना, मोह अशा प्रवृत्ती आहेत ती कर्मे विपरीत कर्मे समजावीत. अयज्ञीय भावनेने केलेले काम हे व्यक्तीलाही पिडते व समष्टीलाही छळते. म्हणून ते अशिष्ट, असामाजिक, असत्य असते. अशी कर्मे निषिद्ध मानावीत. कर्मबंधनातून सुटण्यासाठी कर्मच न करणे हेही त्याज्य तमोगुणात राहून आळसाने कर्म न करणाऱ्याचाही भगवंताने निषेध केला आहे. काहीच न करणे म्हणजे अकर्म. निःसंग होऊन जगणे वेगळे व निष्क्रिय होऊन राहणे वेगळे. संन्याशीसुद्धा जगत्कल्याणासाठी कर्मे करीत राहतात. ज्ञानी संत-संन्याशी अनासक्त होऊन सतत कर्मरत राहत असतात. स्वतःचा संसार न करता जगाचा संसार करतात. आदि शंकराचार्य, स्वामी रामतीर्थ, स्वामी विवेकानंद यांनी स्वतःसाठी कर्म केले नाही. अखिल विश्वाच्या कल्याणासाठी मात्र अहोरात्र झटले.



म्हणून कर्म सुकर्म व्हावे. ते विकर्म किंवा अकर्म होऊ नये. कर्म कोणते व अकर्म कोणते याबाबतीत आचार्य-विद्वान यांच्यामध्येसुद्धा गोंधळ असल्याबद्दलचा उल्लेख १६व्या श्लोकामध्ये भगवंतांनी केला आहे. संन्याशी स्वतःसाठी काहीच करीत नाहीत तसे अभिमान व फळ सोडून केलेले कर्मदेखील अकर्मच! गीतेत 'अकर्म' शब्द 'अकर्मी' या अर्थी अभिप्रेत नाही. कर्म किती करता यापेक्षा ते कसे करता हे महत्त्वाचे आहे. संकल्परहित अनासक्त भावनेने केलेले कर्म हेही अकर्मच. कर्म असूनही अकर्म! माणसाने आळशी राहता कामा नये तसेच केलेले कर्म हे चिकटताही कामा नये. जसे कमलपत्राला पाण्याचा थेंब चिकटत नाही तसे कर्मसुद्धा निःसंग होऊन करावे. असे कर्म करून जर ब्रह्मार्पण झाले तर तशा ब्रह्मार्पणाला अर्थ आहे. ज्यात आपली वासना अडकलेली आहे अशा ब्रह्मार्पणाला काय अर्थ? म्हणून कर्मफलापासून कसे सुटायचे ह्याचा मार्ग भगवंतांनी या पुढील श्लोकांतून केला आहे. कर्म करूनही अकर्म कसे प्राप्त करून घ्यायचे हे सांगितले आहे.

कर्माची गती अतिमहान आहे. कर्मामुळे किती लोकांचे कल्याण झाले हे जग मूल्यमापन करते, पण ईश्वराच्या दरबारात तुम्ही कर्म कोणत्या भावाने व कसे केलेत हे पाहिले जाते. १८ ते २३ पर्यंतच्या श्लोकांमध्ये कर्म, अकर्म व विकर्म यांचा खुलासा झाला आहे. १८व्या श्लोकांत भगवंत म्हणतात,

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ।।१८।।**

"कर्माचे ठायी अकर्म व अकर्माचे ठायी कर्म ज्याच्या नजरेस येते तो पुरुष सर्व मनुष्यांत ज्ञानी आणि तोच युक्त व सर्व कर्मे करणारा होय."

भगवंतांनी कर्म करूनदेखील अकर्मी कसे राहावयाचे हे सांगितले आहे. पद्मपत्राप्रमाणे चिखल-पाण्यात राहूनदेखील अलिप्त कसे राहावयाचे याचे मर्म यांत विशद केले आहे. शरीर-मनाद्वारे नियत कर्म चालू असूनही स्वतः कर्मरहित राहावयाचे हीच खरीखुरी अकर्म वा कर्मरहित अवस्था आहे. असा मनुष्यच खरा बुद्धिमान होय. बाहेरून प्रवृत्ती व आतून निवृत्ती अशी अवस्था साधता आली पाहिजे. अशा कर्म व ज्ञान यांच्या सामंजस्यातूनच ईश्वरी तत्त्वाकडे जाणे सुलभ होते. पहिल्या पाच अध्यायांत कर्म व ज्ञान यांचे सामंजस्य साधणे हाच प्रमुख उद्देश आहे.

कर्माद्वारे मन-बुद्धी शुद्ध झाल्याखेरीज ज्ञान लाभणे असंभवच आहे. तसे कर्म हा ज्ञानलाभाचा एकमेव उपाय आहे. कर्मयोगाद्वारा बुद्धी सूक्ष्म झाल्यावर मगच त्या बुद्धीत ज्ञानाची उपलब्धी होईल. परमेश्वर विषयबुद्धीला अगोचर आहे. परंतु शुद्धबुद्धीला गोचर आहे. म्हणून फलकामना सोडून कर्म करणे हाच

ज्ञानलाभाचा एकमेव उपाय आहे. म्हणून गीताकार म्हणतात की, निष्काम होऊन कर्म करा, अविरत कर्म करा. परंतु कर्म करीत असताना आतून कर्मरहित, अकर्मी राहा व योग्याची अचल शांती अनुभवा."

इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादींना सदा काम करू दे. परंतु अकर्म भावाचा प्रत्यक्ष अनुभव प्राप्त करून घेऊन सर्व कर्मांपासून अलिप्त राहायचे, हाच गीतेचा संदेश आहे. सर्व कर्मे करीत असताही आपण खरोखर कर्म करीत नाही हे जाणतो तो ज्ञानी! सूर्याचे बिंब पाण्यात पडते पण सूर्य पाण्यात असत नाही. त्याप्रमाणे ज्ञानी मनुष्य कर्मे करीत असतानाही तो नैष्कर्म्ययुक्त असतो. ज्ञानी मनुष्य कर्माचरण करीत असताना ते आभासात्मक आहे असे समजून स्वतः कर्मरहित आहे, असे जाणतो.

साक्षात्कार झाल्यानंतर भगवान शंकराचार्यांनी हातात गीता घेऊन कन्याकुमारीपासून काश्मीरपर्यंत जे महान कर्म केले ते गीतेच्या परिभाषेत अकर्म होते. ते म्हणत,

**"यद्यत् कर्म करोमि तत्तदखिलं शंभो तवाराधनम् ।"**

शंकरा, मी जे-जे कर्म करतो ते-ते सारे कर्म तुझी आराधना आहे. म्हणून कर्मामध्ये जो अकर्म पाहतो व अकर्मात जो कर्म पाहतो तोच खरा बुद्धिवान! ज्ञानेश्वर माऊलींच्या शब्दात...

**"म्हणोनि सर्वांपरी मुक्तु । तो सकर्मचि कर्मरहितु ।**
**सगुण परि गुणातीतु । एथ भ्रांती नाही ।।११४।।**

"तो सर्व प्रकाराने मुक्त आहे. कर्मे करीत असतानाही कर्मरहित आहे व गुणयुक्त असूनही गुणातीत आहे."

'कर्माचे ठायी अकर्म' हीच नैष्कर्म्यसिद्धी. यासंबंधी पुढील दोन श्लोक अत्यंत महत्त्वाचे आहेत -

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः ।।१९।।**
**त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः ।**
**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ।।२०।।**

"ज्याचे सर्व समारंभ म्हणजे कर्मे कामनाविरहित असतात त्यालाच 'ज्ञानाग्नीने कर्मे दग्ध झालेला' पंडित असे ज्ञाते पुरुष म्हणत असतात." ।।१९।।

"कर्मफळाची आसक्ती सोडून नित्यतृप्त व निराश्रय (निरालंब) झालेला मनुष्य (लोकांच्या दृष्टीने) कर्माच्या ठिकाणी प्रवृत्त झालेला दिसला तरी तो (वास्तविक) काहीच करत नाही." ।।२०।।

निष्कामता प्राप्त होण्यासाठी कर्मे करताना चित्तशुद्धी अपरिहार्य आहे. काम, क्रोध, लोभ असे विकार तसेच कर्मातील अहंकार नाहीसे होऊन मन-



बुद्धी शुद्ध झाल्याखेरीज नैष्कर्म्यता साध्य होत नाही. या श्लोकावर ज्ञानेश्वर माऊली म्हणते,

**आणि हे कर्म मी करीन । अथवा आदरिले सिद्धी नेईन ।**
**येणे संकल्पेही जयाचे मन । विटाळेना ।।१०४।।**
**ज्ञानाग्निचेनि मुखे । जेणे जाळिली कर्मे अशेखे ।**
**तो ब्रह्मचि मनुष्यवेखे । वोळख तू ।।१०५।।**

"ज्याच्या चित्तात हे कर्म मी करीन अथवा आरंभिलेल्या कार्यात मला यश मिळेल या कल्पनेने ज्याचे मन अस्थिर होत नाही, ज्ञानरूपी अग्नीद्वारे सर्व कर्मे ज्याने जाळून टाकली आहेत तो मनुष्याचे रूप घेतलेले प्रत्यक्ष ब्रह्मच आहे असे तू समज."

अशी नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त झालेला पुरुष नित्य आनंदाच्या साम्राज्यात आनंदरूप होऊन राहिलेला असतो. आत्मबोधाने महासुखाची गोडी घेत, 'आत्मौपम्येन' नजरेने जगाकडे पाहत असतो. कर्म करीत असताही कर्मरहित व गुणयुक्त असूनही गुणातीत अशी त्याची अवस्था असते.

**म्हणोनि सर्वांपरी मुक्तु । तो सकर्मुचि कर्मरहितु ।**
**सगुण परि गुणातीतु । एथ भ्रांति नाही ।।११४।।**

अशा प्रकारच्या कर्माला 'अकर्म' असे म्हटले आहे. अहंकाररहितता, अनासक्ती, नित्यतृप्ती व शरणागती असे चार भाव त्या कर्मात व्याप्त असतात. कर्माच्या ठायी अशा प्रकारे अकर्मी राहणाराच आपली सर्व कर्मे ब्रह्मार्पण करू शकतो. पुढील श्लोकात अशा समर्पित जीवनाचे चित्र रंगविले आहे.

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ।।२१।।**
**यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते ।।२२।।**
**गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ।।२३।।**
**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।**
**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ।।२४।।**

"ज्याला फळाची आसक्ती नाही, अंतःकरण ज्याच्या ताब्यात आहे. जो (स्वतःसाठी) भोगवस्तूंचा साठा करीत नाही, जो स्वतःच्या शरीरधारणेपुरतेच व्यवहार करतो, त्याला कर्म करूनही पाप लागत नाही." ।।२१।।

"यदृच्छेने जे मिळेल त्यात समाधान मानणारा, सुखदुःख यासारख्या द्वंद्वापासून मुक्त असलेला, निर्मत्सर, करीत असलेले काम यशस्वी झाले वा न

झाले, तरी जो समचित्त राहतो, अशा माणसाला त्याने कोणतेही काम केले तरी त्याचे बंधन असत नाही.'' ।।२२।।

''कर्माविषयी किंवा फलाविषयी आसक्ती नसणाऱ्या ज्ञानाच्या ठिकाणी बुद्धी स्थिर असलेल्या आणि प्रत्येक काम यज्ञीय भावनेने, प्रभूचे काम समजून करणाऱ्या माणसाचे संपूर्ण कर्म (बंधन) लयास जाते.'' ।।२३।।

''अर्पण म्हणजे हवन करण्याची क्रिया हे ब्रह्म, हवि म्हणजे हवन करण्याच्या वस्तू म्हणजे ब्रह्म, अग्नी ब्रह्म, हवन करणाराही ब्रह्म. अशा रीतीने सर्व कर्मे ब्रह्मच आहेत अशी ज्याची बुद्धी झाली त्याला ब्रह्मप्राप्तीच व्हावयाची.'' ।।२४।।

या सर्वच श्लोकांतून भगवंताने कर्माचे रहस्य उलगडले आहे. नैष्कर्म्यासिद्धीच्या प्राप्तीचे सोपान सांगितले आहेत. आपल्या अमर्याद इच्छा-वासनांना नियंत्रणात आणून संयमित केले पाहिजे. कोणाचाही द्वेष-मत्सर नाही, राग-लोभ नाही, अमर्याद आशा-आकांक्षांना आवर घातला आहे, अशी स्थिती जेव्हा येते त्या वेळी अंतःकरण प्रसन्न, शांत राहते. जेव्हा चित्त सुखदुःखात सम राहते त्या वेळी ते अनाग्रही होते, अपरिग्राही होते. संसारातल्या गोष्टीपासून अलिप्त झालेले चित्त परमेश्वराच्या ठिकाणी लिप्त होते. असा पुरुष आपली सर्व कर्मे भगवंताला अर्पण करतो. समचित्त होऊन, ईर्ष्या, द्वेष, मत्सररहित असा पुरुष कर्मबंधनात सापडत नाही. शुद्ध अंतःकरणाने समर्पित होऊन केलेली कर्मे यज्ञस्वरूप होतात. ''इदं न मम'' म्हणत कृष्णार्पण भावनेने केलेले प्रत्येक काम यज्ञ होते. आपल्या साऱ्या ऊर्जेला परमेश्वराच्या चरणी वाहून संपूर्ण सात्त्विक स्थिती प्राप्त करून त्याच्या हातून ब्रह्मयज्ञ पार पडतो. सर्वच ब्रह्म समजून स्वतःलाही अर्पण करून, भक्ती, वैराग्य, विवेक, श्रम, दम, तितिक्षा, उपरती, श्रद्धा, समाधान या गुणांनी तो मंडित होतो. त्याच्या शुद्ध चित्तात मैत्री, करुणा, मुदिता, उपेक्षा उत्पन्न होते. असा पुरुष परब्रह्मस्वरूप होऊन जगात वावरतो.

**म्हणवूनि ब्रह्म तेचि कर्म । ऐसे बोधा आले जया सम ।**
**तया कर्तव्य ते नैष्कर्म्य । धनुर्धरा ।।१२१।।**

अशा सोप्या, सरळ शब्दांत नैष्कर्म्यसिद्धीचे निरूपण माऊलींनी केले आहे. अशा साम्यवृत्तीने आपले विहित कर्म, कर्तव्यकर्म केले तरी ते नैष्कर्म्य! कर्म न करणे किंवा संन्यस्त राहून कर्माचा आरंभही न करणे म्हणजे नैष्कर्म्यता नव्हे हे तिसऱ्या अध्यायातदेखील भगवंताने कथित केले आहे. अशा नैष्कर्म्यातूनच चित्तशुद्धी होते.

कर्म, विकर्म, अकर्म हे तीन शब्द या अध्यायात अत्यंत महत्त्वाचे आहेत. कर्मफलापासून कसे मुक्त व्हावयाचे याचा मार्ग भगवंतांनी सांगितला आहे. अशा पद्धतीने कर्मे करणाराच उच्चस्थितीला पोहोचू शकतो. चित्तशुद्धीसाठी आंतरिक स्थितीला अत्यंत महत्त्व आहे.



आपली कर्मे अनेकवेळा बाहेरून शुद्ध, सात्त्विक दिसत असतात. पण आतून तशीच नसतात. अध्यात्मात कर्म कोणत्या प्रेरणेने, हेतूने, भावाने झाले आहे हेच महत्त्वाचे आहे. लोकसेवा, सार्वजनिक सेवा, दान, उपवास, जप-जाप्य इ. कर्मे करीत असताना मन एकीकडे व शरीर एकीकडे असे होता कामा नये. तीर्थयात्रा करीत असताना मनाच्या पावित्र्याकडे, शुद्धतेकडे जर लक्ष दिले नाही तर अशा तीर्थयात्रेचे कोणते पुण्य पदरात पडेल? उपवास करीत असताना परमेश्वराच्या चिंतनात जर मन एकाग्र झाले नसेल व हातून ईश्वराचे काम घडत नसेल तर त्या बाह्य उपवासाला काय मूल्य आहे? मंदिरात किती वेळा जाऊन नमस्कार करतो, पूजा-पाठ करतो त्यापेक्षा माझे चित्तैकाग्र्य होते की नाही हे अधिक महत्त्वाचे. नामस्मरण किंवा प्रार्थना करीत असताना मन जर विषयाचे चिंतन करीत असेल तर ह्या बाह्योपचारापासून काय साध्य होणार?

प्रत्येक कर्माचा संस्कार चित्तात उमटत असतो. अशा अनेक कर्मांच्या शृंखलेतून वृत्ती बनत असते. त्यामुळे कर्म हे स्वभाव घडविण्यास कारणीभूत ठरते. रोजच्या छोट्या-मोठ्या कर्मातून मन-बुद्धीवर सतत आघात घडत असतात. विषय-वासनांची, विकारांची जळमटे कमी करून मन-बुद्धी दिव्य बनवायची असतील तर उपरोक्त नैष्कर्म्यता अंगी आणली पाहिजे. कर्माला विकर्माची जोड मिळाली की त्यातूनच अशी अकर्मस्थिती निर्माण होते. 'अकर्म' स्थितीत कर्तेपणसुद्धा निघून जाते. सर्व संतांच्या कर्मामध्ये हा अकर्मपणा दिसतो म्हणून त्यांच्या कर्माला सुगंध असतो. सत्संगतीचे महत्त्व याचसाठी आहे. रामकृष्ण परमहंस, रमणमहर्षी यांच्या प्रत्येक कर्मात आईचे हृदय असायचे. ज्ञानेश्वर हे संत-शिरोमणी पण त्यांना संतांची मांदियाळी 'माऊली' म्हणूनच संबोधायची. समाजाकडून कितीही उपेक्षा, मानहानी झाली तरी या संतांच्या हृदयामध्ये क्षोभ, शल्य, विषाद, चीड अशा भावनांना थाराच नसतो. मनातील अपरंपार माया, वात्सल्य कुठेही विरून जात नाही. प्रशांत मन व बाह्य आचरण यात पूर्ण एकवाक्यता असते.

ज्यांना ही नैष्कर्म्यता साधत नाही असे मग साधक असोत अथवा समाजसेवक असोत, कुटुंबी असोत नाहीतर संन्यासी असोत, त्यांच्या अंतःकरणात सतत क्षोभ, सुख-दुःखाची आंदोलने, अपेक्षाभंगाचे शल्य किंवा फलप्राप्ती न झाल्यामुळे होणारी मनाची अशांती हे सर्व निर्माण होऊन असे कर्म चित्ताचा कबजा घेत असते.

कर्माचा संबंध भक्तीशी असा आहे. कर्म व भक्ती जणू एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. कर्माशिवाय मनुष्य क्षणभरही राहू शकत नाही. कर्म तरी अटळच आहे. संन्यासीसुद्धा त्याला अपवाद नाही आणि कर्म करताना अंतःकरणाची जी शुद्धता, मन-बुद्धीची जी स्थिरता, त्यावरच भक्तीची उत्कटता अवलंबून आहे. कर्म आपणास सर्व बाजूंनी प्रभावित करीत असते. कर्माची ही

गहनता जर आकळिली नाही तर भक्तीत दिव्यत्व येणे दुरापास्त. मनाची प्रगमनशीलता, उदात्तीकरण सर्वस्वी कर्माच्या हेतूवरच अवलंबून आहे. साधकाच्या कर्मात शुद्ध सात्त्विक भाव जर असेल तर त्याने केलेल्या कर्माची यत्किंचितही बाधा त्याला होत नाही. परमेश्वराला अर्पण करून केलेल्या कर्माची नोंद स्वतः परमेश्वरच घेतो. म्हणून जे जे कर्म घडेल ते ते तुझ्यासाठीच हा भाव असणे म्हणजेच नैष्कर्म्यता - अकर्मता.

म्हणून कर्म करीत असताना ते का व कसे करायचे याचेही 'ज्ञान' आवश्यक आहे. चौथ्या अध्यायाच्या उत्तरार्धात ज्ञानाचे महत्त्व, कर्म व ज्ञान यांचा संबंध व श्रद्धेचे बळ याचे महत्त्व भगवंतांनी विशद केले आहे. संसारात कर्मे करीत असताना ती अलिप्ततेने कशी करावीत याचे मर्म 'ज्ञानात'च आहे. चित्त शुद्धीसाठी विविध यज्ञ साहाय्यक होतात, पण सर्वांपेक्षा अधिक साहाय्यक ज्ञानयज्ञच होतो. या दृष्टीने ३३ व ३४ हे श्लोक महत्त्वाचे आहेत.

**श्रेयान्द्रव्यमयाद् यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ।।३३।।**
**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ।।३४।।**

"हे परंतपा! द्रव्यमय यज्ञापेक्षा ज्ञानमय यज्ञ श्रेष्ठ, कारण हे पार्था! सर्व प्रकारच्या सर्व कर्मांचे पर्यवसान ज्ञानात होत असते." ।।३३।।

"ध्यानात ठेव की ते ज्ञान प्रणिपाताने, प्रश्नाने आणि सेवेने तत्ववेत्ते ज्ञानी पुरुष तुला उपदेशितील." ।।३४।।

द्रव्य यज्ञापेक्षा तपयज्ञ, त्यापेक्षा योगयज्ञ व या सर्वांपेक्षा ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे, असे भगवंत सांगतात. दृढ संकल्प करून स्वाध्याय केला पाहिजे, आत्मचिंतन व महापुरुषांचा सत्संग करून ज्ञानयज्ञ संपन्न केला पाहिजे. ब्रह्मज्ञानाचे दान सर्वश्रेष्ठ दान आहे. विश्वातील सज्जनांनी अशी ज्ञानाची मशाल घेऊन जर ज्ञानदान केले तर अज्ञानाचा अंधार राहणार नाही.

ज्ञानाचे महत्त्व पुढील सर्व श्लोकांत (३५ ते ४२) भगवंतांनी कथन केले आहे. ज्ञान प्राप्त झाल्यानंतर 'वासुदेवः सर्वम्' अशी दृष्टी येईल. कितीही पापी जरी असला तरी ज्ञाननौकेनेच तो तरून जाईल. ज्ञानरूपी अग्नीच सर्व कर्मांचे शुभाशुभ भस्म करून टाकतो.

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति ।।३८।।**

या प्रसिद्ध श्लोकात ज्ञानाचे महत्त्व विशद केले आहे. ज्ञानासारखे पवित्र या लोकी खरोखरच दुसरे काही नाही.

**जैसी अमृताची चवी निवडिजे । तरी अमृताचि सारखी म्हणिजे ।**



**तैसे ज्ञान हे उपमिजे । ज्ञानेसिची ।।१८३।।**

जशी अमृताला अमृताचीच उपमा द्यावी लागते तशीच ज्ञानाला ज्ञानाचीच. असे ज्ञान अंतःकरणात स्थिर झाल्यावरच शांतीचा अंकुर फुटतो व मगच आत्मज्ञानाचा विस्तार प्रकट होतो.

असे ज्ञान मिळवावयाची प्रक्रियादेखील भगवंतांनी उपरोक्त ३४व्या श्लोकात अर्जुनाला सांगितली. आजच्या काळात तर त्याची अधिक आवश्यकता आहे. शाळा-कॉलेज-विद्यापीठातून आजच्या विद्यार्थ्याला जे ज्ञान प्राप्त होते त्या पुस्तकी ज्ञानापेक्षा जीवनाच्या ग्रंथातून जे ज्ञान मिळते ते अधिक श्रेय (आत्मकल्याण) व प्रेय (भौतिक सिद्धी) देणारे आहे. 'प्रणिपातेन' म्हणजे अतिशय विनम्र होऊन, बुद्धी समर्पित करून, पूर्ण विश्वास ठेवून तत्त्वदर्शी ज्ञात्याकडून ज्ञान मिळविले पाहिजे. यासाठी खरोखरीच्याच ज्ञानी पुरुषाची निवड साधकांनी केली पाहिजे. अशा ज्ञानी माणसाजवळ तितक्याच आदराने, उत्कट भावाने व प्रेमाने, श्रद्धेने गेले पाहिजे. गुरू-शिष्यांच्या हृदयांची स्पंदने एकतारी व्हावयास पाहिजेत. 'सेवया' व 'परिप्रश्नेन' हे ज्ञान मिळविले पाहिजे. अर्जुनाने जसे प्रत्येक वळणावर सारखे प्रश्न विचारले व मोहनिरास होऊन 'करिष्ये वचनं तव' या अभिवचनापर्यंत जसा आला तसेच ज्ञानार्थीने प्रश्न विचारले पाहिजेत. गुरूजवळ केवळ श्रद्धेनेच नव्हे तर सेवाभाव मनात ठेवून कृतिशील व्हावयास पाहिजे. आजच्या शिक्षणक्रमात या सर्व गोष्टींची उणीव निर्माण झाल्यामुळेच, गुरू-शिष्यांमध्ये प्रचंड दरी निर्माण झाली आहे... ज्ञान म्हणजे प्रभावी विचारांचे प्रक्षेपण! दैवी विचारांनी मनःपरिवर्तन झाले पाहिजे. मन बदलले की कर्म बदलते. मन उदात्त तर कर्म, भक्ती उदात्त. "मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः ।" अशा मनाचे परिवर्तन विचारांनीच होते. विचारांनीच बुद्धी बदलते व बुद्धी बदलली की मन व तसे आचरणही. व्यक्तिमत्त्वातील हा सारा बदल ज्ञान-सामर्थ्याने होतो म्हणून भक्ती ही ज्ञानयुक्त पाहिजे.

असे ज्ञान मिळविण्यासाठी श्रद्धायुक्त अंतःकरणही पाहिजे.

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ।।३९।।**

"हे ज्ञान जो श्रद्धावान पुरुष इंद्रियसंयमन करून व तत्पर होऊन प्राप्त करतो त्याला अत्यंत श्रेष्ठ अशी शांतीदेखील प्राप्त होते."

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ।।४०।।**
**तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।**
**छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ।।४२।।**

"जो अज्ञानी असतो. (ज्याची ईश्वर, गुरू व साधनामार्ग यावर श्रद्धा नाही) आणि ज्याला या सर्वांविषयी शंका वाटते, तो परमार्थापासून पूर्णपणे दूर जातो.

संशयखोर माणसाला या जगात सफलता मिळत नाही, उत्तम परलोकही मिळत नाही आणि साधे सुखही मिळत नाही.'' ।।४०।।

''म्हणून हे अर्जुना! अज्ञानामुळे तुझ्या मनात जो संशय उत्पन्न झाला आहे, तो ज्ञानरूप तलवारीने छाटून टाकून कर्मयोगाचा स्वीकार कर आणि (युद्धाला) उभा राहा'' ।।४२।।

ज्ञान मनुष्याला पवित्र करते. चित्तशुद्धी झाली की ज्ञान प्रतिष्ठित होते. असे ज्ञान प्राप्त झाले की शांती, प्रसन्नता प्राप्त होते. पण ज्या मनुष्यास सतत संशयाने घेरले आहे व जो अश्रद्ध आहे तो ज्ञानाला मुकतो. असा मनुष्य धड इहलोकी सुखी होऊ शकत नाही व त्यास परलोकही प्राप्त होत नाही. म्हणून असा संशय, अशी अश्रद्धा, असे अज्ञान, ज्ञानाने व आत्मश्रद्धेने दूर करून युद्धास तयार होण्याचा उपदेश भगवंतांनी शेवटी अर्जुनास केला आहे. अर्जुनाचे माध्यम करून, ज्ञान प्राप्त करण्याचा उपदेश हा सर्वांसाठीच आहे हे गीताकारांनी उपदेशिले आहे.

आत्मज्ञानाने ज्याने आपली कर्मे संन्यस्त केली आहेत व जो कर्मबंधनात अडकला नाही असा मत्सरशून्य, अनासक्त, निष्काम, शांत व प्रसन्न पुरुष होण्यात जीवनाचा पुरुषार्थ आहे. तसा पुरुषार्थ होणे, हेच जीवनसाफल्य आहे. चौथ्या अध्यायात, जीवन सार्थक करण्याची ही युक्ती भगवंतानी विशद केली आहे.

पण ज्याला स्वतः ज्ञान नाही व श्रद्धाही नाही असा संशयखोर मनुष्य नाश पावतो. संशयखोराला हा लोकही नाही, परलोकही नाही व सुखही प्राप्त होत नाही. म्हणून ''हृदयात निर्माण झालेला हा संशय ज्ञानरूप तलवारीने छाटून टाक व योगाचा आश्रय करून युद्धाला उभा राहा'' - असा उपदेश अर्जुनाला शेवटच्या श्लोकात भगवंतांनी केला आहे.

कर्मे करीत असूनही अकर्मी, अलिप्त राहावयाचे असेल तर अशा सर्व गुणांची साधकाला नितांत आवश्यकता आहे. आत्मज्ञानाचे महत्त्व व ते मिळविण्याची सुंदर प्रक्रिया या अध्यायात सांगितली आहे. जो आतून शुद्ध, बुद्ध, ज्ञानी झाला त्याला संशय कसा घेरणार? अशा शुद्धभावाने, ज्ञानाने कर्म करणाऱ्याला ते कर्म शुभाशुभ परिणामाने आत्मोद्धाराला बाधक तरी कसे होणार? इंद्रियनिग्रही, निर्मम, निरहंकारी, विकाररहित, द्वेषरहित, संकल्प-विकल्पविरहित, शांत, निर्मळ व त्यातही ज्ञानी पुरुषाला कर्माची बाधा कशी पोचणार? अशा ज्ञानी पुरुषाच्या कर्माला सुगंध येतो व ते कर्म भगवंताच्या चरणी रुजू होते. भक्तीचे सार, कर्माचे रहस्य, ज्ञानाची महत्ता अशा विविध विषयांनी चौथ्या अध्यायाची पूर्तता झाली आहे.

**।।श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**



# सर्वांसाठी गीता

## एक जीवनग्रंथ

भाग-१

## लेखक परिचय

| | | |
|---|---|---|
| नाव | : | प्रा. दत्तात्रय नारायण दुभाषी |
| जन्म | : | १९ जानेवारी १९४१<br>बेळगाव |
| शिक्षण | : | १) एम. ए. (इंग्रजी - संस्कृत)<br>२) एम. ए. (मराठी) |
| व्यवसाय | : | पत्रकार व माध्यमिक शिक्षक म्हणून १० वर्षे<br>महाविद्यालयीन प्राध्यापक म्हणून ३० वर्षे<br>अशी एकूण ४० वर्षे सेवा.<br>गोपाळकृष्ण गोखले कॉलेज, कोल्हापूर येथून इंग्रजी विभागप्रमुख म्हणून निवृत्त. |
| छंद व आवड | : | • सतत भ्रमण - ५ वेळा अमेरिका-कॅनडा येथे प्रदीर्घ वास्तव्य. युरोप-मिडलईस्ट इ. ठिकाणचा प्रवास.<br>• वक्तृत्व - नाट्य - लेखन यांच्या विशेष आवडीमुळे वर्तमानपत्रे व मासिकांतून अनेक विषयांवर व्याख्याने व लेखन – निसर्गात पदभ्रमणाची विशेष आवड.<br>• योग-प्राणायाम यावर प्रबोधन - व्याख्याने व प्रात्यक्षिके. |
| सामाजिक कार्य | : | • श्री ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा अशा संतसाहित्यावर व भगवद्गीतेवर गेली १५ वर्षे सतत प्रवचने व व्याख्याने यातून समाजप्रबोधन.<br>• गीता व ज्ञानेश्वरी यावरीललेखमाला प्रसिद्ध.<br>• अध्यात्म व तत्त्वज्ञान याचा प्रचार व प्रसार हेच जीवनध्येय |